कला-प्रकाशन
१

*
* *

# चन्द्रकला

* *
*

कृष्णमूर्ति; कविरत्न.
आनन्दराव मानकर; बी. ए.

प्रथमावृत्ति ] १९४१ [ किं. १॥ रुपया.

# अनुक्रम.


| | | | |
|---|---|---|---|
| | | | पृष्ठ |
| १ | चन्द्रकला | कृष्णमूर्ति | १ |
| २ | तुक्याचा संसार | मानकर | १६ |
| ३ | सभ्यता | कृष्णमूर्ति | २१ |
| ४ | शेतकऱ्यांचा कैवारी | मानकर | २५ |
| ५ | तम्बूची दुनिया० | कृष्णमूर्ति | ३० |
| ६ | भोळा भाव | मानकर | ३३ |
| ७ | पाणी! पाणी!! पाणी!!! | कृष्णमूर्ति | ४१ |
| ८ | लेकबाय | मानकर | ४५ |
| ९ | दैवाचा फेरा | कृष्णमूर्ति | ५१ |
| १० | सीमोल्लंघन | मानकर | ६० |
| ११ | इलेक्शनूची विलक्षण कथा | कृष्णमूर्ति | ६६ |
| १२ | दोन उपदेशक | मानकर | ८० |
| १३ | माझें राष्ट्रीय स्वप्न | कृष्णमूर्ति | ८४ |
| १४ | इज्जत | मानकर | ८८ |
| १५ | जीवन | कृष्णमूर्ति | ९३ |
| १६ | बुवाचा मठ | मानकर | १०४ |




## चन्द्रकला : : : :

" कान्त ! तुमच्या कादम्बरीला पहिल्या नम्बरचं मेडल् मिळालं म्हणून, आम्हाला कांहींतरी बक्षिस हवं गडे आज ! त्याशिवाय इथून हालायचंच नाहीं असा अगदीं निश्चय करून आलें आहे मी वर ! "

" कला ! अग खुळी आहेस तूं ! बक्षिसाकडून कुठं बक्षीस मागायचं असतं कां ! मीच तर मुळीं तुला मिळालेलं बक्षीस ! किंवा ' मेडल् ' म्हण हवं तर भलं मोठं थोरलं ! ज्या उमेदवाराला ' मेडल् ' दिलं जातं; त्याच्या कपडयाला तें टांचून देण्याचा प्रघात नाहीं कां ? मग आपल्या लग्नाचे वेळीं, देवाब्राह्मणांसमक्ष अन् पंच साक्षीदारांसमोर, तुझ्या कपडयांना माझ्या कपडयाची घट्ट गांठ बांधून मला टांचण्यांत आलें; तें तुझं मी ' मेडल् ' म्हणूनच नव्हें का ? "

" पण ' मेडल् ' लावून जसं कुठल्याहि समारंभांत अभिमानानं मिरवितां येतं तसं हें ' मेडल् ' लावून जर......... "

"छान, छान, छान; अगदीं पेंचांत सांपडलीस चन्द्रकला तूं आतां या बक्षिसाच्या! तसंच हें 'मेडल्' लावूनच कुठल्याहि समारंभांत अभिमानानं अन् मानानं मिरवितां येत नाहीं कां तुला? कुठलाहि महत्त्वाचा अन् पवित्र असा भारी समारंभ व्हायचा असला म्हणजे, तुम्हां बायकांना हें 'मेडल्' कपड्यास टांचूनच त्या समारंभांत मोठ्या गर्वानं मिरवितां नाहीं कां येत? हें 'मेडल्' जिच्याजवळ नाहीं, तिचा दर्जा दुय्यम अन् कधीं कधीं तर विचारांत न घेण्याइतकासुद्धां खालच्या प्रतीचा मानण्यांत येतो! हें योग्य कीं अयोग्य हा प्रश्न वेगळा; पण आज लौकिकांत ही रूढि प्रचलित आहे खास! कां? खरं कीं नाहीं माझं म्हणणं?"

"मला अगदीं कुठल्याकुठं नेवून सोडलंत तुम्ही कान्त! गोष्टीला सुरुवात करावयची गवताच्या काडीपासून; अन् तीमधून सगळ्या ब्रह्मांडाचा वेदान्ती खटाटोप पुढें मांडायचा, ही तर तुमची नेहमींचीच करामत! मग उगीचंच कां मिळालं तुम्हाला एवढं महत्त्वाचं अन् सन्मानाचं मेडल्! कुठून अन् कशा सुचतात गडे तुम्हांस या कल्पनांच्या कोलांट्या न कळे! पण कान्त! मला अशी बनवूं नका हो ऽ! तें कांहीं नाहीं. आम्हाला बक्षिस हवंच आज कांहीं तरी!"

"पण मी नाहीं कधीं म्हटलं तुला? मूळ बक्षिसावर पुन्हां शीग म्हणून हें 'मेडल्' घे आणखी हवं तर! म्हणजे एका बक्षिसाचे मागणींत दोन बक्षिसांचा अनायासें लाभ!"

एका लहानशा खोलींत, कान्त आपल्या लिहिण्याचे टेबलाशीं बसलेले होते एका खुर्चीवर; अन् चंद्रकला उभी होती त्या खुर्चीच्या हातावर आपला हात ठेवून अन् कान्तांकडे किंचितशी रेलून. त्या खोलींत एक टेबल, एक खुर्ची, टेबल क्लॉथवर दोन तीन ठिकाणीं शाई सांडलेली, खुर्चीला घातलेली कुशन दोनतीन ठिकाणीं उखडलेली, टेबलाचे एका कोपऱ्यावर ठेवलेल्या टाइमपीसची जिल्हई कुठें कुठें अगदींच निघून गेलेली तर कुठें कुठें पिंवळसर काळसर पडलेली, टेबलाशीं लगतच अंथरलेल्या सतरंजीचे मधून मधून फुसडे उडालेले, त्या सतरंजीवर इंग्रजी–मराठी–बंगाली–हिंदी–संस्कृत भाषां-

तील विविध विषयांवरील कांहीं पुस्तकें अस्ताव्यस्त पडलेलीं, कांहीं पाठकोरे कागद—कांहीं पाठकोरीं हँडबिल्स यांची गल्लत इकडे तिकडे विस्कळीत झालेली, कांहीं नियतकालिकांचे अङ्क इतस्ततः विखुरलेले, तिथेंच एका स्टूलवर सुपारीचे तबक पडलेलें व तेंहि दोनतीन ठिकाणीं थपटें झालेलें, सिगारेट्सूर्ची अर्धवट जळालेलीं थोटकें; टेबलावरील एका पुस्तकावर ठेवलेली मद्रासी नसीची जुनेर डबी; असा संसारसंभार होता कान्ताच्या लेखन कलेचा. कलेनें नेहमीं म्हणावें कान्तांना कीं, आपल्यासाठीं एक सुंदरसें टेबल व मॉडर्नमेकची एकादी तरी खुर्ची, अगदीं जरूर विकत आणावयास पाहिजे म्हणून. पण——!

आज आपले कान्त कांहींशा उद्‌विग्न मनःस्थितींत असलेले कलेला आढळून आले; आणि म्हणूनच बक्षिसाचें निमित्तानें तरी बोलणें काढून त्यांची मनःस्थिति पालटण्याचे विचारानें कलेनें त्यांच्याशीं बोलणें प्रारंभिलें होतें. कलेशीं बोलतांना, तिच्या तल्लख दृष्टिक्षेपांतून आपल्या चेहऱ्यावरील वारंवार होणारे बदल चुकवावेत म्हणून, कान्त कितीतरी प्रयत्न करीत होता; पण थण्डी-ज्वरापूर्वी येणारी थण्डी टाळण्याकारितां जसजसे अधिक प्रयत्न करावेत, तसतशी ती थण्डी अधिकाधिकच हुडहुडून येते त्याप्रमाणें कान्ताचें झालें! त्याला न कळत त्याच्या डोळयांतून सळकन् अश्रुबिन्दु ओघळून, कलेच्या गोऱ्या गोऱ्या, नाजुक, मृदु, गोण्डस अन् स्फटिकासारख्या तकतकत असलेल्या हातावर पडले!—

"कान्त! कान्त! काय वाटलं तुम्हाला इतकं तुमचं हृदय डहुळून जाण्यासारखं! सांगा ना! मी सहज विनोदानें बोलले बक्षिसासंबंधीं, त्यांत तर नाहीं ना आपल्या नाजूक मनाला कर्दळण्यासारखे खडे लागलेले? मला क्षमा नाहीं कां करणार तुम्ही माझ्या अपराधाची कान्त!" कलेनें आपल्या जवळच्या हातरुमालानें कान्तांचे डोळे पुशीत अन् आपल्या डोळ्यांतून अश्रू टपटपवीत कान्तांची विनवणी केली. कान्तेला जवळ घेऊन तिचे डोळे व आसू पुशीत, भारावलेल्या अन्तःकरणानें अन् गदगदलेल्या कण्ठांतून निघणाऱ्या कांपऱ्या कांपऱ्या खोल आवाजानें कान्तानें बोलण्यास सुरुवात केली—

" कला ! मला पुष्कळदां असं वाटतं ग कीं, आपण मरून जावं ! मस्तकांत कित्येकदां असा कल्लोळ उठतो या विचारांचा कीं, दुनियेंत भूतखाना आहे म्हणतात ना; तो सगळा माझ्याच मेंदूंत थकूथै थकूथै थैमान घालीत आहे नुसता असं वाटायला लागतं अगदीं! तूं कुठें तरी बाहेर गेलेली असतेस त्या वेळीं, मी अगदीं पंधरा पंधरा मिनिटें सारखा इथें रडत बसतों कला ! पुन्हां मनाला असा धाक वाटतो कीं, इतक्यांत कोणी आलें तर आपणांस काय म्हणेल ! त्यास आपल्याबद्दल काय वाटेल ? तो आपणास भित्रा–भीरू-दुबळा-संसार-युद्धाच्या धुमश्चक्रींतून पळ काढूं इच्छिणारा पळपुटा-भ्याड-नाहीं कां म्हणणार ? पण पुन्हां असेंहि दुसरें मन म्हणतें ग कीं, असल्या लोकांना इतकें भ्यायचें तरी कां म्हणून! फक्त गळवावर चोंच मारण्यांतच कृतकृत्यता मानणाऱ्या ह्या गिधाडांना गळवावर मलमपट्टी करतांना कधीं पाहिलं आहे कां कुणी? मनाच्या दुखाव्यांतून जरा कुठें पू वहायला लागला कीं, त्यावर आणखी पुन्हां आपल्या तीक्ष्ण चोचींच्या टोंचण्या मारून मारून त्याचें भगदाड करण्याकरितांच यांची सारी करामत नि खटपट ! सान्त्वनाच्या एकाददुसऱ्या अक्षराची तरी मलमपट्टी करण्याचें, यांच्या मनानें कधीं घेतलें आहे कां ? ज्यांना, आपल्या हातीं असलेल्या वाळ्याचे पंख्यानें; विकल अन् व्याकूळ जीवास क्षणभर वारा घालण्याची मानवीबुद्धि उरलेली नाहीं, त्यांना त्याच पंख्याचे दांडीनें अशा विगलीत जीवास कुचकण्या मारण्यांतच समाधान वाटावें,हा मानवी मनाच्या अजबबंगल्यांतील एक विचित्र देखावा नव्हे कां !"

हें बोलत असतां, मेघांतून विजा तळपाव्यात त्याप्रमाणें कान्ताच्या डोळ्यांतील बुबुळांतून तेजशलाका लवलव करीत असत ; व त्याच्या चेहऱ्यावरील सणसणाऱ्या लाल छटा कमी जास्त होत. कलेला हें ऐकण्यासहि धीर होईना ; पण मन सांवरीत सांवरीत, आतुर दृष्टीनें लक्ष लावून कान्ताजवळ बसून, हा सगळा ज्वालामुखींतून उफाळणारा उत्तप्त लाल लाल लोहरस, कला आपल्या कानांत ओतून घेत होती व मनांत शिरूं देत होती. कान्तानें पुढें बोलण्यास सुरवात केली—

"कला! आपण मरून जावं असं जें मला पुष्कळदां वाटतं; तें ह्या असल्या

गिधाडांच्या बजबजपुरीमुळेंच वाटतं असंहि कांहीं नव्हे ! त्या गिधाडांच्याच टोळींत शिरून त्यांच्याच शिक्का-मोर्तबानें त्यांच्याच आचरणांचें अगदीं आदर-पूर्वक अनुकरण करून, जगांत वावरण्याचा मनाला कांहीं केल्या धीर होत नाहीं; अन् म्हणून अनेक दुःख-आपत्ति-विपत्तींशीं झुंजीं घेतां घेतां कधीं कधीं मन टिचून जातं, आणि म्हणायला लागतं कीं, आपणच मुळीं या गिधाड-खान्यांत चिवडाचिवड करण्यास नालायक आहोंत, तेव्हां नकोच हा ओढा-ताणीचा जीवलोभ !

"कला ! आतां मात्र माझ्याच्यानें राहवत नाहीं तुझ्याजवळ कांहीं गोष्टी सांगितल्याशिवाय ! उगमांतच धक्के बसायला लागल्यामुळें हा ओघ, तुला अज्ञात असलेल्या कितीतरी गोष्टी आतां तुझ्या पुढ्यांत आणून सोडणार कला ! तुला हें तर अगदीं शंभरदां कळून चुकलेलं आहे ना कीं माझं मन, एखाद्या लहान मुलाच्या मनाइतकं स्वच्छ अन् शुभ्र आहे म्हणून ! अन् म्हणूनच त्यावर लहानसासुद्धां वेडाविद्रा डाग निर्माण होत असेल तर तो टाळण्याची माझी जिवापाड खटपट नेहमीं चाललेली असते; हेंहि तुझ्या पूर्णपणें नेहमींचेंच परिचयाचें आहे."

"कान्त ! अन् अशा कित्येक प्रसंगीं मी तुम्हाला माझ्या अज्ञानपणामुळें कां होईना; पण पुष्कळदां म्हटलेलें नाहीं कां ? कीं, तुम्ही कशाला असल्या गोष्टींत मन घालतां ! आपणाला काय करायचं आहे साऱ्या जगाचं बरं-वाईट बघून ! उगीचंच मनाला त्रास करून घ्यायचा आणि एवढंहि करून पुन्हां कोणी धन्यवाद द्यायला तयार; तर नांवानं खडे फोडायलाहि कुणीतरी तितक्याच आवेगानें उत्सुक असायचेच. एका घटकाचे हितसंबंध साधतांना तुम्ही केवळ तत्त्वाकडे दृष्टि ठेवून एखादें महत्त्वाचें कार्य करतां, पण त्याचवेळीं तें ज्यांच्या अहिताचें होतें ते घटक तुमच्या नांवानें खडे फोडणारच ! त्यांना कुठली इतकी तात्त्विक-शुद्धतेची शहानिशा ! मनुष्य-स्वभाव इथून तिथून सारखाच नाहीं कां असायचा ! मनुष्य-स्वभावांतील अमानुषपणाचा एक शेवटचा लहानसा अंशसुद्धां जोंपर्यंत शेष राहील, तोंपर्यंत वाळल्याबरोबर ओलं जळालं जायचंच इथें ! तुमच्या हळव्या अन् विशुद्ध मनाचा अशा या लांगड्यांत भडका नाहीं उडणार तर

काय होईल ?...... पण नको ना कान्त असले विचार आतां आणखी मनांत आणायला ! माझ्याकडे नाहीं कां तुम्हाला पहायचं ! सगळ्या जगाच्या उलाढाली अन् दलामली एका पारड्यांत अन् रात्रंदिवस तुमची चिंता वाह-णारं माझं ओलंओलं चिंब झालेलं मन एका पारडयांत कां घालीत नाहीं कान्त तुम्ही ! बघा तर खरं, मग कुठलं पारडं तुम्हाला हलक्या दर्जाचं दिसतं अन् कुठल्या पारडयाचा जडपणा तुमचें लक्ष वेधून घेतोय तें ! ”

“ पण मी स्वभावाला काय करणार कला ! तुला कळतें तें मलाहि कळतें ! अग एवढंच नव्हे; मी जर एखादं नाटक लिहायला घेतलं तर हुबेहूब माझ्याच स्वभावाचं एखादं पात्र त्यांत घालून, अतिरिक्त सज्जनपणाची इतकी किळस-वाणी भूमिका चित्रित करीन कीं सगळ्या लोकांनीं संभ्रमांतच पडावं या सज्जन-पणाच्या महतीबद्दल. कधीं कधीं तर माझ्या असंहि अनुभवाला आलेलं आहे कीं, सज्जनपणाच्या अगदीं कळसावर बसून केलेलें कर्तव्य, बघणारांच्या विविध दृष्टिकोनामुळेंच विकृत होऊन, दुष्कृत्यांत—अधमकृत्यांतसुद्धां जमा होतं पुष्कळदां; न् मग अंगाची अन् मनाची अशी लाही लाही होऊन जातें कीं, जीवास तें दिव्य सोसणं असह्य होऊन बसतं ! तरीपण, अन्तर्मनाचा चम-त्कारच असा आहे कीं, क्षणैक हेलकावा निघून गेल्यावर पुन्हां जिथलं पाणी तिथेंच येऊन समावतं ! ”

खेद, आश्चर्य, उपहास, विडंबन, करुणा, त्रागा, संताप या सप्तरंगीं भावनांच्या उठावानं घडलेलं कान्ताचं प्रत्येक वाक्य; कलेच्या अंतःकरणाचा ठाव घेई व तें ऐकतांना तिच्या मनांत सोसाट्याचं वादळ उठे. ती शक्य-तोंवर स्वतःला सांवरून, कान्ताला सांवरण्याचा आटोकाट प्रयत्न करीत होती. हीं दोन्हीं नाजूक व्यवधानें सांभाळतांना तिच्या मनाची सारखी धांदल उडत होती.

“ कला ! ” कलेची पाठ आपल्या उजव्या हाताच्या चार बोटांनीं हळु-वारपणें थोपटीत व प्रेमार्द्र दृष्टीनें तिच्या मस्तकाकडे न् डोळ्यांकडे पाहात, कान्त पुन्हां आपल्या विचारांचा आवेग सैल सोडूं लागला—

“ कला ! मी तुला खरंच सांगून टाकूं कां ! माझ्या या कल्पनेला कोणी

बावळी कल्पना म्हणेल तर म्हणूं दे, मरूं दे त्यांना; 'समुद्राचं तळ, वर वर उडणाऱ्या पाकोळ्यांना दिसलं असतं तर मोठमोठ्या शास्त्रज्ञांना कशाला डोकेफोड करावी लागली असती त्यासाठीं! समुद्राच्या वरच्या पाणथरालाच समुद्रसर्वस्व मानून, त्यांतच आपली पडछाया बघत बघत त्या पापुद्र्यावर भराऱ्या मारणाऱ्या पाकोळ्यांची महत्ता, त्यांच्यापुरतीच असणार! पाणबुड्याला नांवें ठेवण्याच्या भानगडींत असल्या फडफडणाऱ्या पाकोळ्यांनीं न पडणेंच बरें नाहीं कां!

"मला असं पुन्हां पुन्हां वाटतं कला! मला जडलेल्या या व्यवहारविन्मुखतेच्या असाध्य महारोगामुळें, माझ्यापेक्षां तुलाच अधिक कष्ट न् त्रास नाहीं कां सोसावे लागत? हा दुर्धर महारोग जर असाच आणखी कांहीं कालपर्यंत माझ्यावरील आपला अंमल उठवूं शकला नाहीं; तर तुझें कसें होईल कला! एका महारोग्यानें दुसऱ्या निरपराध पण साध्या भोळ्याभाबड्या जीवास, दुःखाच्या खाईंत नेऊन गळ्यापर्यंत गाडावें व त्याच्या विव्हळण्याचे भेसूर सूर आपल्या उघड्या कानांनीं ऐकावें हें मला नाहीं सोसवणार! माझ्या बाबतींत मी तेवढी काळजी कधींच केलेली नाहीं; पण...माझी कला...!"

कान्तास एकाएकीं अनावर हुंदका आल्यानें त्यानें बोलणें थांबविलें. कलेनें कान्तास सावरून आपल्या पदरानें त्याच्या डोक्यास व मस्तकास वारा घालण्यास सुरुवात केली. कलेनें पुष्कळ प्रयत्न करून पाहिला, पण तिचा गळा रुद्ध झाल्यानें, तिच्या तोंडांतून शब्द बाहेर फुटेना! थोड्याच वेळांत कान्ताच्या मनाचा आवेग ओसरल्यावर, कलेच्या कपाळावरून हळूंच हात फिरवीत कान्तानें आपलें बोलणें पुढें ताणलें—

"माझी कला, मी आज कोणत्या स्थितींत बघत आहे! हळदीच्या गाभ्यासारखी—सोनसळीसारखी—माझ्या कलेची देहयष्टि कशी मलूल अन् क्लान्त झालेली आहे! आज कित्येक महिने सारखे चालले आहेत नुसत्या विचारांत कीं एखादं सुन्दरसं टॉनिक आणून तें तरी द्यावं; पण नुसत्या विचारापेक्षां अधिक काय घडलं आहे या हातून! कला! अन् तुला नाहीं ग वाटत कधीं? कीं, इतर चारचौघी बायकांप्रमाणं आपणांसहि दोन दागिने घालून

मिरवितां यावं म्हणून ! तुझ्या मैत्रिणी तुला हिणावितात म्हणून तूं अलीकडे घराबाहेर कुठेंहि जाईनासी झालीस हें माझ्या लक्षांत नसेल कां आलं ! तुझीं तीं दोनच पातळं; किती दिवसपर्यंत जपणूक करीत आहेस तूं त्यांची ! सणावारीं, तुझ्या गोड गोड हंसण्याचा सुधारस तूं मला यथेच्छ वाढावास आणि माझ्या कादंबरी—लघुकथा—लघुतमकथा—लघुनिबन्ध—कविता या पंचामृताचें तोंडीलावणें मी तुला आग्रह करून करून वाढावें, हींच ना आपलीं अभिनव मधुर रुचकर पक्वान्नें ! कला ! हंसतेस ना तूं हें ऐकून ! रडण्याचं रूपांतर हंसण्यांत करण्याची कला, आमच्या कलेशिवाय कुणाला इतकी सुन्दर साधली असेल असें वाटत नाहीं मला ! खरें ना कला हें ! परवां आपली लली गेली, त्यावेळींहि माझा तोल सुटूं नये व माझ्या आत्यंतिक भावनावश मनाला चरका बसूं नये म्हणून माझ्या कलेनें एवढा दुःखाचा हिमालय मुक्या मनानं आपल्या शिरावर झेलला; तो प्रसंग कांहीं इतक्यांतच विसरलों नाहीं मी ! त्यावेळीं जर कला ! कुणाला हें रहस्य कळालें असतें कीं, ललूला १०५ डिग्री ताप असलेला पाहूनहि मी गजाननरावांची ओळख एका सद्‌गृहस्थास करून देण्याकरितां नागपूरला गेलों, व माझ्या मागेंच ललू केवळ अव्यवस्थेमुळें गेली ! तर माझी संभावना, व्यवहारीजगानें पागल म्हणूनच नसती कां केली ? अथवा स्वार्थी (?) म्हणून तरी ! !

मागच्या वर्षीं तुझा लहान भाऊ वैशाख, एकाएकीं गेला; तुला जाणेंच जरूर होतें माहेरीं; पण पुरेसे पैसे माझ्याजवळ नाहींत हें तुझ्या तल्लख तर्कबुद्धीस पटतांच तूं आपणहूनच जाण्याचा बेत तहकूब केलास ! अन् मी उगीचच जा जा म्हणून खोटाच आग्रह तुला केला तरी तूं म्हणालीस, "काय उपयोग आतां जाऊन तरी; जाईन ४।८ दिवसांनीं !" तें तुझें वाक्य ऐकतांच दारिद्र्याची करवत करकरा कापून गेली माझ्या अंतःकरणास ! "

" कान्त ! पुरे आतां या आठवणी ! काय आरंभलंय तुम्हीं हें आज ! हा सारा इतिहास तुमच्या मनाला अधिकाधिक नाहीं कां विषण्ण करीत ? कान्त! मी तुम्हाला कितीदां तरी सांगितलं ना कीं सारे दुःखाचे ढग निवळून जातील देवाचें दयेनें केव्हां तरी; अन् न निवळले तरी त्या ढगांच्या कडांना-

ही कला कान्ताची जोडी आपल्या तात्त्विक समाधानांची सात्त्विक रुपेरी रंगच्छटा देऊन, त्याचें भीषण दृश्य नाहींसें करण्यास पूर्ण समर्थ आहे. आतां पुरे गडे ह्या आठवणी ! एखादी गोड लघुकथा किंवा कविता ऐकवावी आतां. अन् मग चहा मिळणार बक्षीस ! ”

ओसाड देवळांतून निघालेल्या गंभीर ध्वनिप्रमाणें कान्तानें आपल्या कृत्रिम अन् औदास्यपूर्ण हास्याच्या साथींत, चंद्रकलेच्या इच्छेस रुकार दिला. कलेच्या गालावर अंगठ्याजवळच्या बोटानें एक नाजुक आघात करीत कान्त म्हणाला—

“ आतां ही बक्षिसाची प्रतिक्रिया सुरू झाली म्हणायची ? माझ्याकडील बक्षिस मागून घेण्यापूर्वींच, तूंच मला बक्षिस देण्यास तयार झालीस कला अं ! व्यवहार-शून्य पतीची तूं व्यवहार-शून्य पत्नि खरोखरच नाहीं कां शोभलीस ! कला ! तूं जशी आतां मला बक्षिस देतें म्हणतांना व्यवहार विसरलीस, सज्जनतेनें झपाटली गेलीस, सात्त्विकतेने भारली गेलीस, दैवी गुणांनीं पछाडली गेलीस, मानव्याच्या थापेंत आलीस, औदार्याचे गळीं लागलीस, पावित्र्याचे पाठीस लागलीस, दानतीमध्यें विलीन झालीस, भावनावशतेंत समरस झालीस, थोरपणाच्या आहारीं गेलीस, अन् मूळस्वभावाच्या पात्यांत सांपडलीस त्याचप्रमाणें; अगदीं हुबेहूब त्याप्रमाणेंच आतांपर्यंत माझ्या आयुष्याचें झालेंं नाहीं कां ! नाहींतर आतांपर्यंत माझी कला...! नुसत्या इन्द्राची इन्द्राणी करून ठेवतां आली असती मला ! आतां ती मी एका जोग्याची जोगीण करून ठेवलेली आहे ! अन् ती कां ? तर—

—एका तोतया लेखकानें कान्ताचे मानेवर सपशेल सुरा फिरवून, त्याच्या रक्तरंजित लिखाणावर आपली गंगाजळी लक्षावधि रुपयांनीं तुडुंब भरली असतांनादेखील, कान्तानें ‘ ऊं ऽ ऽ जाऊं दे ’ म्हटलें म्हणून !

—विश्वासानें गळे कापणाऱ्या गळेकापूच्या गळ्यांत गळा अडकवून, आपल्या गळ्यांतील पुष्पहार असल्या कसायांच्या गळ्यांत घालण्याचा भीषण खेळ, कान्ताचे खेळकर स्वभावानें केला म्हणून !

—विश्वचि माझें घर असें निर्भ्रांतपणें उमजून, घरावरील विश्वास, विश्वावर ठेवण्याचे प्राणघातकी प्रयोग कान्तानें अनेकदां करून पाहिले म्हणून !

—दैवी-गुणांच्या उपकरणांनीं देवाचीच पूजा करायची हें तंत्र विसरून किंवा बाजूला ठेऊन, राक्षस व देव यांना सारख्याच सुगन्धाचीं फुलें व सारख्याच मोलाचा दशांगधूप कान्तानें दाखविला म्हणून !

—अजूनहि कान्त या अक्षम्य स्वभावदोषांपासून अलिप्त होऊं शकला नाहीं; व पुढें होईलच अशी नक्की खात्री नाहीं म्हणून !

“ समुद्राच्या तळाचीं हीं अमोल प्रमेयें ज्यांच्या दृष्टीच्या टप्प्यांत येणें शक्य नाहीं त्यांनीं, त्या पाकोळ्यांनीं, बिचाऱ्यांनीं कान्ताच्या अन्तस्तलाची खोली कितीहि वरवर कल्पिली तरी तो त्यांचा दोष नव्हे. जगांतील सगळे बेडूक, गरुडाच्या भरारीनें आकाशांत उड्डाण करूं लागतील तर विष्णूस आपलें वाहन बदलून घेण्याचा प्रसंग नाहीं कां येणार!’

एक खोल प्रदीर्घ निःश्वास सोडून कान्त म्हणाला,—

“ बरं पण कला ! आतां तूं मला बक्षिस देणार आहेस ना ! मग जा तर तूं आपल्या उद्योगाला लाग; तोंवर मी एक सुन्दर जीवनकथा लिहून तुला वाचून दाखवितों ! बघूंया माझी जीवनकथा अधिक मिठास वाटते तुला, कीं तुझा चहा अधिक सुरस लागतो मला तें !

“ हश्‍शं ! ”

कला स्वयंपाकघरांत निघून गेली !

जुनेरलेल्या पण स्वच्छ अशा एका लांकडी ट्रेमधून चहाचे दोन कप व्यवस्थित ठेऊन, कला आपल्या कान्ताचे खोलीजवळ जाऊन पहातें तों—?

दारास कुलूप घालून कान्त बाहेर पडलेले !!

चहाचा ट्रे कलेच्या हातून खळकन् गळून पडला व ती आपला तोल सांभाळून अनिमिष नेत्रांनीं त्या दाराकडेच घटकाभर विषण्ण अन्तःकरणानें, एखाद्या स्फटिकाच्या पुतळ्यासारखी पहात उभी राहिली ! दाराच्या वरच्या

एका कुसांत एक लहानशी चिठ्ठी अडकवून ठेवलेली दिसली कलेला ! चिठ्ठींत कान्तानीं खालील मजकूर लिहिलेला होता;—

" कला ! मला असंच वाटतं गऽ कीं आपण मरून जावं !"

—'तुझा कान्त.'

कला ढसढसा रडली !! कान्त !...... ! काय केलंत हें तुम्ही ...... ! अखेर फसवलंत ना मला कान्त ! आतां तुमची कला...... !"

कलेचें सर्व शरीर रोमांचित झालें व तिचा देह कंपायमान होतसाता घामानें डबडबून गेला ! —

× × × ×

पंधरा वर्षांनन्तरचा योगायोग !

" कुणाचें हें एवढें मोठें विशाल स्मारक ?"

सज्जनपूर येथील एका भव्य स्मारकाकडे बोट दाखवून, एक वेडसर बाई, त्या स्मारकाच्या रखवालदारास विचारीत होती !

" तुझ्या नवऱ्याचें ! "

खूप रागाऊन त्या उद्धट रखवालदारानें गडगडून शिवी हांसडली !

" माझ्या कान्तांचें ? कान्तांचें माझ्या हें स्मारक ? " चढत्या पण रडत्या आवाजांत त्या वेडसर बाईनें रखवालदारास, खोदून खोदून दोनदां निकडीनें प्रश्न विचारला !

" तुझ्या कान्तांचें ऽ ऽ ? तुझ्यासारखा वेडसरच होता वाटतं तो, तुझा कान्त व्हायला ? तूं तर मोठी रंगेलवेडी दिसतेस वेडप्ये ! चल् ! नीघ इथून! वेडपी कुठली ! " तिच्या अंगावर चाल करीत जाऊन रखवालदार खेकसून धांवला.

ती वेडी तिथेंच बसली, अन् कांहीं केल्या जागची हलेना.

" माझे कान्त ! माझा कान्त ! " अशी सारखी बडबडत होती ती !

" माझे सज्जन कान्त ! माझे उदार कान्त ! माझे लेखक कान्त ! माझे

कवि कान्त ! माझे देव कान्त ! " अशी खूप खूप बडबडत होती ती. मधून मधून ओक्साबोक्सी रडायची अन् पुन्हां कान्त कान्त म्हणून बडबडायची !

तिच्या सत्याग्रहापुढें अखेर तो रखवालदार जर्जर झाला अन् त्यानें तिला फरफटतच त्या स्मारकाच्या प्रवेशद्वाराजवळ नेलें.

" हं, मर आतां इथें ! " तिला तिथें झटक्यानें सोडून देऊन रखवालदार बाहेर निघून गेला.

एकसारखी त्या प्रवेशद्वाराकडे टक लावून ती वेडी पाहात बसली व विजेचा धक्का बसावा त्याप्रमाणें एकदम उभी राहून, समोरच्या मोठ्या संगमरवरी दगडावर कोरलेल्या लेखाजवळ जाऊन पोंचली. तिला चांगलें वाचतां येत होतें ! संगमरवरी दगडावर सुन्दर शिलालेख कोरलेला होता.

# " कान्त "

## तो एक महान् लेखक होता !

## ' कान्त ' महान् थोर विभूति होती !

कांहींहि लिहिण्यापूर्वी, ' आतां काय लिहायचें ?' हा विचार, क्षणभरहि त्यानें कधींच केला नाहीं ! अगदीं स्फटिकासारख्या मनानें तो लिहायला बसायचा; अन् काय जादू-इ चमत्कार असेल कुणास ठाऊक, त्यानें लेखणी उचलून कागदावर ठेवली रे ठेवली कीं, भाषा तर काय, त्याच्याशीं नुसती गोडगोड विलासक्रीडा करायची. प्रत्येक शब्द न् शब्द त्याच्याशीं अगदीं मनोमन बोलायचा नुसता ! वाक्य तयार झालें कीं अहाहा ! जणूं सरस्वतीचेंच दैवी–प्रासादिक–दिव्य वचन तें ! प्रत्येक रस; प्रत्येक अलंकार, प्रत्येक उपमा–उत्प्रेक्षा; दास–दासींप्रमाणें प्रत्यक्ष त्याच्या समोर हात जोडून उभे ! हुकूम सुटायचाच काय तो अवकाश, कीं ' जी हुजूर ' म्हणून त्यांची ललकारी तयार !

त्याच्या लेखनांत पांचहि प्राणांचें अस्तित्त्व होतें ! त्याचें लेखन, लेखहि असे; कलापूर्ण चित्रहि असे; आणि दिव्यात्मा असणारी सुंदर–चेतन–आक-

षेक–दिव्य कायाहि असे ! शब्द–वाक्य–भाषा यांनींच त्याला घडविलें, कीं यांचाच तो ब्रम्हदेव होता, ही गुंतागुंत उलगडण्यासारखी नव्हतीच मुळीं ! उन्मत्तरसाचा परिपोष त्याची लेखणी करूं लागली कीं, वाचक धुंद–फुंद होऊन गरमगरम श्वाससुद्धां सोडायचे; इतकी नशा–एवढा उन्माद–असें चैतन्य–ओतायचा तो, त्या लेखनांत ! कोमल मनोभावनांचें हळुवार–नाजुक मृदु–ललित–मधुर–गोडगोड चित्रण तो करूं लागला कीं, वाचकांना असे वाटायचें, जणुं आपण गुलाबपाणी शिंपडलेल्या वाळ्याच्या पडद्यांत बसून केशरी सुधारसाची अमृततुल्य मेजवानीच झोडीत आहोंत ! शृंगार–अनंग–रसाचा तर तो मूर्तिमंत कामदेवच ! उमलत्या तरुण–तरुणींच्या अंगाअंगांतून सुरसुरी न् रोमांच खुदखुदायचे त्याचे लेख वाचून ! ओकासा–गोल्डन् टॉनिक-पाक नि अवलेह दूर ठेवावेत अन् हें लेखन वाचून मनोमन त्यांचीं सुरसुरी खुलवावी, एवढा त्याच्या मादक लेखनांत मस्तपणा ! करुणरस ? तो लेखकच मूर्तिमंत करुणरसाची मूस ! करुणरसाचा कुंचला त्यानें आपल्या लेखनावरून फिरविला कीं वाचक? वाचक काय विचारतां ! वाक्यागणिक हुंदके द्यायचे ! किती कितीदां पुस्तक मिटून मिनिट मिनिटपावेतों नुसते डोळेच पुशीत बसायचे ! आपण रडताहोंत हें कुणी पाहत तर नाहीं ना, म्हणून मधून मधून सभोंवार बघायचे ! त्यानें लिहिलेलें करुणरसपरिप्लुत लेखन, दुसऱ्यास वाचून दाखवा-यचें म्हणजे वाचकानें एक मोठें दिव्यच करायचें असें ! हास्यरसालाहि त्यानें हंसवावें व विनोदाशींहि त्यानें विनोद करावा, असा त्याचा महान् अधिकार ! वाचकांनीं खूप पोट भरून जेवावें न् त्याचें हास्य–विनोदपर लेखन वाचाव-यास घ्यावें कीं; सगळा दिवाणखाना, सगळी बैठक, हादरून जायची नुसती ! हंसण्याखिदळण्याचे कल्लोळावर कल्लोळ ! नांवसोके संभावित, आपली ‘ संभा-विती ’ क्षणभर विसरून हंसतां हंसतां गडबडा लोळायचे ! अजीर्ण होण्या-इतकीं तुडुंब भरलेलीं पोटं ! अगदीं पुढच्या भुकेस हात पसरून स्वराज्य-वाद्यांप्रमाणें तयार ! कशाला हिंगाष्टक नि फ्रूट–कुशन–लाईम सॉल्ट !

त्याच्या लेखणीच्या टोकाला, सरस्वतीच्या अन्तःकरणांतली विविध रस-मिश्रित शाई लावलेली असेल ? नवचे नवहि रस त्याच्या मनांत जागरण करीत खडा पहारा देत असतील ? ब्रह्मदेव नि सरस्वती यांनीं आपलीं सर्व

प्रकारची ' रॉयल्टी ' त्याला अखण्ड देऊन टाकली असेल ? त्याच्या मेन्दूंत सगळ्या रसालंकारांच्या भट्टया नेहमीं पेटलेल्याच राहात असतील ? त्याच्या अन्तःकरणांत सर्व रसाच्या खुंट्या पिरगाळित एखादा देवदूत बसला असेल ?

असें म्हणतात कीं—

* * * *

त्याच्या आजाराची शुश्रूषा यथायोग्य होण्यापुरते पैसे त्याच्याजवळ सबन्ध आयुष्यभर न जमल्यामुळे तो मेला ! कुणी म्हणतात, मनःस्तापाचा झटका त्याचे हळुवार हृदयाला सोसला नाहीं म्हणून तो मेला ! त्याची आठवण रोज कितीतरी रसिक लोक, श्रीमंत लोक, धनाढ्य जन, वारंवार काढतात ! खूप स्तुति ! खूप वाहवा ! खूप महिमा ! खूप गुणगान् !

शेवटचं सर्वांचं एकच ठराविक वाक्य—

**' कान्त ' महान् लेखक होता !**
**' कान्त ' महान् थोर विभूति होती !**

× × × ×

दुसरे दिवशीं—

प्रातःकाळची नितान्त प्रशान्त वेळा !

क्षितिजाचे आड असलेल्या सूर्यदेवाचें दर्शन घडून जीवाचें समाधान व्हावें म्हणून, गगनांतरीं खूप उंच उंच भराऱ्या मारून; चण्डोलपक्षी भैरवरागांत कूजन करीत होते.

शिवाच्या विशाल देवळांतील भजनाची शेवटची भैरवी चालू होती—

' भाई ! यह तन थाट तंबूरे का ।
ऐंचत तार, मरोरत खूँटी; निकसे राग हजूरे का ।
बिखरे तार, टूट गइ खूँटी; होगया घूरंघूरेका ।
भाई ! यह तन थाट तंबूरे का ।'

थोड्याच वेळापूर्वी आकाशांत टचा टचा टचटचीत दिसणारे असख्य तारे, हळूं हळूं लुप्त होत होत, जीवनाची अशाश्वति मनुष्यमात्रांस पटवीत होते.

भूतलावरील त्यागी अन् महान् विभूतींच्या प्रथम स्वागतार्थ, गुलाल-पुष्पें उधळण्यास उषादेवि नुकतीच सुसज्ज झालेली होती.

अशा त्या प्रातःकाळीं;—

कान्ताच्या त्या स्मारकाच्या पायथ्याशीं ती वेडीबाई निष्प्राण पडलेली होती !

—अन्..........शिलालेखाचे खालीं कोळशानें, कांपऱ्या कांपऱ्या अक्षरांत लिहिलेला पुढील **नवीन मजकूर**, लोकांचीं हृदयें डहुकून काढीत होता —

" कला—कान्त ! "

**माझेच ते कान्त !**

**अन् त्यांचीच मी चन्द्रकला !**

कान्तांचे चरणीं हें शेवटचें बक्षिस समर्पण !

कान्तांनीं कलेला बक्षिस वाहिलें !

कलेनें कान्तांना बक्षिस वाहिलें !!

कान्त !

—तुमचीच

ही

मी

सुभागी

—चन्द्रकला !

× × × ×

हा नवीन मजकूर, मूळ हस्ताक्षराबरहुकूम त्याच शिलालेखाखालीं पुनः कोरण्यांत आला.

# तुक्याचा संसार ! : : : :

—'तुमच्या काकानं काय पैशांचा हंडा ठेवलाय् आमच्याकडे ! उठल्या-बसल्या द्या पैसे म्हणायला लाज नाहीं वाटत ? हलकट लेकाचे...'

दिवाणजींचा पारा चढलेला होता, सरास साऱ्या कामगारांना उद्देशून ते ओरडत होते. डोक्याला जरीकांठीं लाल रुमाल, त्यांत उजव्या कानावर खोवलेली पेन्सील, अंगांत शेरवानीवजा कोट, त्याच्या बाह्या कोपरावर फाटलेल्या, कमरेला बिनकांठी मळकट धोतर, त्याचा एक सोगा मुरडून निऱ्यांजवळ खोवलेला अन् पायांत पुणेरी जोडा; असा कवटीपासून खोटीपर्यंतचा त्यांचा साज होता. डाव्या हातांत लांबचलांब एक कागदांचें भेंडोळें होतें. कामगारांच्या याद्या अन् हिशेबांचें कागद असावेत ते. त्यांच्या दाढीचे खुंट उठावदार दिसत. त्यांतच लाल रुमालांतून बाहेर आलेल्या घामाचा एकेक थेंब त्यांवरून घरंगळत येई अन् कोटावर पडून बेपत्ता होई. जणूं सरांतून गळणारीं पोवळींच तीं.

पांच सात फुटांवर एक कामगार, आपले हात छातीजवळ घेऊन चोळत उभा होता. त्याची नजर खालीं होती. त्याचे हात चुन्यानें माखलेले होते, त्याच्या अंगावरील चिंध्या पण चुन्यामातीनें डागळलेल्या दिसत, अन् गुडघ्यांपासून खालच्या उघड्या पायांवर चुन्याचेच ठिपके होते. दिवाणजीनें धारण केलेला जमदग्नीचा अवतार लक्षांत घेऊन तो वळला. वळतांना एखाद्या अवजड धोंड्यासारखें वाटलें त्याला आपलें शरीर. त्यानें दोनच पावलें टाकलीं ; तीं पण आपण कोणीकडे जातो यांची मुळीच जाणीव नसतांना. इतक्यांत;—

'तुक्या ! बरं घे ! या वेळेला तेवढा देतो !' दिवाणजींचे ते शब्द कानीं पडतांच देव पावल्याचा आनंद झाला त्याला. दोन्हीं हातांची ओंजळ करून त्यानें तो रुपया घेतला. त्याच्या चेहऱ्यावरील उदासीनतेची छाया जाऊन एकाएकी उत्साहाची लकाकी आली. तशीच ओंजळ मिटून त्यानें दोन्हीं हात

कपाळापर्यंत नेले. मोठ्या आदरानें त्यानें दिवाणजीस नमस्कार केला व तो आपल्या त्या चुन-घाणीकडे निघाला.

\+ + +

सायंकाळीं सहाचा सुमार. तरस्यांच्या कामावरील मजूर सुटले होते. आकोल्याचे सुप्रसिद्ध कॉंट्रॅक्टर म्हणून तरस्यांची ख्याती होती. मोर्णानदीच्या पुलाचें तें काम. गेले चार महिने सुमारें पांचशेंवेवर मजूर रोज कामावर असत. ते कामावरून सुटले कीं, एक छोटीशी गिरणच सुटल्यासारखें दिसे.

'तुक्या किधर है ?'

हातांत सोटा, कमरेला सलवार, अंगांत लांब कुडतें, त्यावर जाकीट, जाकीटाच्या खिशांतून वर्तुळाकार लोंबणारी चांदीची सांखळी अन् डोक्यावर त्याचा पेशानिदर्शक पठाणी टोपी असणाऱ्या एका इसमानें गिरजेस हटकलें.

'आमां बायामाणसास्नी काय इचारतुस मेल्या ? पुरुस न्हाइत व्हय !' गिरजा झटक्यानेंच निघाली. तिची तडफ बिजलीसारखी होती.

'साली ! कहां जायगी ! मैं लाला हूं !' डावा हात मिशीवरून फिरवीत पठाण तिच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पहातच होता. इतक्यांत—

'लाला ! ओ रस्त्यानें गया तुक्या ! देख !' जवळच्याच एका बोळाकडे बोट दाखवीत एक मजूर उद्‌गारला. त्याच्या बोलण्यांत जरी भेदरटपणा दिसत होता, तरी त्याच्या चेहऱ्यावर सूडाची छटा डोकावत असल्याचें स्पष्ट दिसे. त्याच्याशीं एक शब्दही न बोलतां, शेजारच्या तारेच्या खांबाला टेकलेली आपली सायकल घेऊन घाईनेंच लाला निघाला.

\+ + + +

'क्यों बे साले ! अब मू छुपाता है ! लेते बखत लाला लाला; और देते बखत मू काला ! बहॉंचोद !'

'लाला ! माझं मूल......!'

'मरा तेरा बच्चा ! मक्कार कहीं का ! शरम नहीं आती ! भागता है ! मर साले......!'

तुक्याच्या कमरेंतून झटक्यासरशीं कांहींतरी हिसकून पठाणानें त्याला एक गचांडी दिली.

तुक्या, गचांडीसरसा खालीं पडला. डोकें शेजारच्या हौदावर आपटलें. त्याच्या कपाळाला उजव्या भुवईवर टेंगूळ आलें. अगोदरच जीर्ण झालेल्या अन् शिवूनसावून कसाबसा अंगांत घातलेल्या सदऱ्याच्या चिंधड्या झाल्या. एक बाही तर हातावेगळीच झाली.

उजव्या हातांत दंडा घेऊन लालानें सायकलवर टांग टाकली. दोन पेडल् मारीपर्यंत तो मागें, तुक्याकडे पहातच होता. त्याच्या जिभेनें जरी आवरतें घेतलें होतें तरी त्याचे लाल डोळे मात्र अजून तुक्यावर शिव्यांचा वर्षाव करीतच होते असें वाटे.

\+ + +

एक पाय उमऱ्यांत अन् दुसरा बाहेर, अशा स्थितींत दारांत रुखमी उभी होती. कवेलूंचें छप्पर होतें तें. तिनें डाव्या हाताचें मधलें बोट दाराच्या कोयंड्यांत घालून त्याचा आधार घेतला होता. तेथूनच ती घरांतील अंधारांत मोठ्या बारकाईनें बघे. लगेच वळून ती दाराबाहेर खूप लांब नजर फेकी. तिच्या दृष्टिक्षेपागणिक तिची अधीरता वाढत होती. तिच्यानें आंत जाववेना अन् बाहेर तिचा पाय घेईना. ती तळमळतच दारांत उभी होती. सामसूम होतें तेथें. नाहीं म्हणायला रुखमाच्या दारापासून दहाच पावलावर उजव्या बाजूला एक कुत्रें, मागच्या पायांवर बैठक घेऊन पाठमोरें बसलें होतें. समोरच्या दोन्हीं पंजांत एक हाड धरून तें, एकदां उजव्या तर दुसऱ्यांदा डाव्या दाढेंत चघळत होतें. अगदीं तल्लीन झालें होतें तें आपल्या उद्योगांत.

डाव्या बाजूला एक कचऱ्याची पेटी होती. शहरवासियांनीं कचरा, पेटींत टाकावा अशी नगरपालिकेची अपेक्षा. त्या अर्थाच्या जाहिराती पण लावलेल्या असतात, पण पेटींतल्या कचऱ्यापेक्षां कितितरी पट कचऱ्याचा ढिगारा तिच्या आजूबाजूनेंच पसरलेला होता. नागरिकांच्या कर्तव्यदक्षतेचा तो एक नमुना होता. घरोघरचा नैवेद्य खावून खरकट्याचीं भांडीं चाटायला चटावलेली एक गाय त्या ढिगाऱ्यावर रवंथ करीत उभी होती. तिचें तोंड रुखमीच्याच

दाराकडे होतें. तिचे डोळे अर्धवट मिटलेले होते. अन् त्यांतून सारखे आंसू वहात होते. रुखमीबद्दल सहानुभूति दाखवीत असावी कां ती !

सूर्य अस्तास गेला होता. अंधाराच्या साम्राज्याची पहांटच होती जणूं ती. रुखमा आंत गेली. वळचणींतली आगपेटी घेऊन तिनें कांडी उगाळली व चुलीजवळच भिंतींत खिळ्यानें बसविलेली पत्र्याची चिमणी लावली. त्या चिमणीच्या प्रकाशांत काय दिसत होतें ? भिंतीवर वीतवीत चढलेली ओल. समोरील कोपऱ्यांत एक पोतें पसरून त्यावर वाकळ घातलेली; अन् एक छोटासा जीव तीवर पडलेला. दुसऱ्या एका वाकळींत तें मूल गुंडाळलेलेंच होतें म्हणाना. त्या बालकाचे डोळे मिटलेले होते. पण त्याच्या कपाळावरील सुंठेचा लेप, ते सुखासुखी झोपलेलें नसल्याचें द्योतक होता. रुखमानें बालकाच्या कपाळावर हात ठेवला. तसें करण्यांत कांहींतरी जाणण्याची तिची उत्कट जिज्ञासा दिसत होती. पण गुलाबाच्या फुलाला हात घालतांना काट्यांशीं गांठ पडली कीं चेहऱ्यावर जे भाव उठतात, अगदीं तसेच भाव रुखमाच्या तोंडावर उमटले. मोठ्या कष्टी हृदयानें तिनें हात काढला, वाकळ बरोबर केली अन् परत दारांत आपल्या पूर्वीच्या जागीं येऊन ती उभी राहिली. थोडा वेळ अगदीं शून्य दृष्टीनें पुन्हां ती रस्त्याकडे पहातच होती. पण तेवढ्यांत---

रुखमानें सेवाचा पदर सावरला. तिच्या चेहऱ्यावर तजेला आला. तिला कुणी तरी मोठाच धीर दिल्यासारखें दिसलें. ती एकदां आंत आली, तिनें बालकावर नजर टाकली व पुन्हां दारांत गेली. इतक्यांत कुणीतरी दाराशीं आलें.

‘ आणली कां दवा ? आज चवथा दिस तापाचा. भिवा इस्त्यावानी गरम झालाय.’ रखमाची वाणी अखंड होती. आपलें हृदयच रिकामें करीत होती जणूं ती. उत्तर ऐकायला वेळच कुठें होता तिला !

‘ तापानं काय माणसं मरत्यात ?’ दाराजवळ आलेल्या व्यक्तीच्या तोंडून शब्द निघाले. आवाज माणसी होता. शिवाय त्या शब्दांत सूड, निराशा, राग वगैरे सर्व भावांचें मिश्रण झालेलें होतें.

‘ भलतंच काय बोलायचं ?’

रुखमाच्या तोंडून अस्पष्टच शब्द निघाले. तिचा गळा भरून आला; डोळे डबडबले.

ती पुढें,अन् तुक्या मागें; अशा स्थितीत ते भिवाच्या बिछान्याजवळ आले.

× × × ×

सकाळीं साताची वेळ होती. म्युनिसिपल कमेटीच्या आवारांत सर्वत्र सामसूम होतें. एक खिडकी तेवढी उघडी होती. तीवर ' जन्ममृत्यूचें नोंदणी ऑफीस ' असा बोर्ड होता. आंत एक कारकून टेबलावर कांहींतरी खरडीत होता. अंगांत नेहरू शर्ट व डोक्यांत पांढरी खादीची टोपी असलेला एक तरुण घाईघाईने खिडकीशी आला. त्यानें उजवा हात गजांतून आंत घालून पैसे टाकल्यासारखें केले.

' नांव काय ? ' कारकुनाने वर न बघतांच प्रश्न केला.

' भिवा. '

' बापाचें नांव ?' हा दुसरा प्रश्न होता.

' तुक्या '

' वय ?'

' तीन वर्षे '



# सभ्यता ! : : : :

'कशासाठीं पोटासाठीं, कशासाठीं पोटासाठीं' हें जीवनगीत गात गात; अकोला स्टेशनचें प्लॅट्फॉर्मवर मेल येऊन थडकली! दिवाळीचे सुटींत, कित्येक बहिणी आपल्या दादा–वहिनींकडे दिवाळसणास निघालेल्या होत्या; तर कित्येक दादा, आपल्या भगिनी–भागिनेयांकडे लाडू करंज्यांची हिंसा करण्याकरितां निघालेले होते. विद्यार्थिगण आपापल्या माहेरीं जाण्यास निघाला होता, अन् विद्यार्थिनींहि आपापल्या मैत्रिणींकडे मजा मारण्यास निघाल्या होत्या. ऑफिसांच्या खुराड्यांत फडफड करून करून पंख झडलेला–नोकरवर्य–नोकरश्रेष्ठ–नोकररत्न आदि सगळा नोकरगण; जीवाची दिवाळी करण्याकरितां, वाट सुचेल तिकडे निघाला होता. जो तो आपापलें सटरफटर सामान घेऊन आगगाडीच्या धांदलींत देहासही विसरलेला दिसून येत होता.

मेल उभी राहतांच सर्व धडपडे, आपापले जीव घेऊन डब्यांत घुसले! आम्हींहि त्यांपैकींच एक होतो. आमचा जीवच आमच्याबरोबर असल्यामुळें, जिवापलीकडे ज्याची जपणूक करावयाची असे कांहीं सामान आम्ही बरोबर घेतलें नव्हतें! धडपडत धडपडत आम्हीं एका डब्यांत शिरलों. डब्यांत तीनच बांकें होतीं. इंडियनदर्जाप्रमाणें या तीन बांकावर पंधरा जीवांनीं आपले देह टाकायचे असा कायदा होता. दोन बांकें एका सुसंस्कृत–सुशिक्षित सभ्य सद्‍गृस्थानें, स्वतःसाठीं व आपल्या सुसंस्कृत सुशिक्षित सभ्य पत्नीसाठीं म्हणून अडवून टाकलीं होतीं! एका सबंध बांकावर श्रीयुत, सुखेनैव पहुडले होते व दुसऱ्या सबंध बाकावर श्रीमती सुखेनैव आडव्या झाल्या होत्या! तिसरें एक बांकडें ५।६ सामान्य अशिक्षित–असंस्कृत–असभ्य–खेडवळ गृहस्थानीं सुसज्ज झालें होतें! अर्थातच आम्हीं डब्यांत शिरतांच, 'आतां पुढें काय–' हाच मायाब्रह्माचा उलगडा करण्याइतका महत्त्वाचा बिकट प्रश्न आमच्यासमोर उभा राहिला! गाडी चालूं लागल्यावर कांहीं प्रयत्न करूंया अशा

समाधानीवृत्तीनें आम्हीं एका खिडकींतून डोकावून प्लॅटफॉर्मवरील लोकांची धांदल पाहूं लागलों ! आम्हांला आमच्या धांदलीचा त्या परदुःख-दर्शनानें क्षणभर विसर पडला ! आम्हीं कोणत्या अडचणींत व चक्रव्यूहांत सापडलों आहोंत याची दादहि आम्हांला यावेळीं नव्हती ! एकदांची गाडी चालूं झाली अन् आम्हींहि आपला मोर्चा डब्यांतील वातावरण न्याहळण्याकडे वळविला ! तिसऱ्या बांकडयांवर बसलेले सामान्य दर्जाचे असंस्कृत-अशिक्षित बंधु, आमच्याकडे अशा सहानुभूतीच्या भावनेनें पाहूं लागले कीं; "काय करावें; येथें जागा असती तर आपणांस आम्हीं जरूर जागा दिली असती." आम्हालाहि त्यांच्या मनांतील ही कालवाकालव स्पष्ट कळून चुकली होती ! दुसरीं दोन बांकें अडविणारे सज्जन, उघड्या डोळ्यांनीं आमचेकडे टकमका पहात होते व नाकावरील सोनेरी फ्रेमचा चष्मा मधून मधून वर करून आपल्या पत्नीशीं गप्पा मारीत होते. वेळ, रात्रीं दहा साडेदहा वाजण्याची होती ती ! आमचें अस्तित्वहि या सुसंस्कृत प्राण्यास मान्य नव्हतें असें त्याच्या एकंदर बेपर्वाई वृत्तीवरून अनुमानितां येत होतें ! अशा स्थितींतच, अगदीं उभ्यानें आम्हीं २५-३० स्टेशनें ओलांडलीं ! गृहस्थानें एक कादंबरी हातांत घेऊन, ती मधून मधून चाळण्याचा क्रम चालूं ठेवला ! पत्नी मधून मधून, त्यांच्या वाचनांत, कांहीं तरी विचारून व्यत्यय आणी ! हा क्रम सारखा कितीतरी वेळपर्यंत अखंड चालला !

कोणत्या शब्दांनीं बोलून त्या सभ्यगृहस्थांच्या सौख्यसमाधीचा भंग करावा तेंच कांहीं कळेना ! अखेर आम्हीं त्यांच्याकडे वळून, इंग्रजी भाषेंत त्यांचेशीं बोलण्यास सुरुवात केली—

"कोणती कादंबरी आहे, आपण वाचीत आहांत ती ?"

जणूं काय ऐकायलाच आलें नाहीं अशी वृत्ति सज्जनानें धारण केली ! पुन्हां तोच प्रश्न किंचित् मोठ्या आवाजांत विचारल्यावर, त्रासिकपणें; कपाळास आंठया पाडून सज्जन उद्गारला, "एक कादंबरी आहे !"

आमच्या मनांतील कालवाकालव त्यावेळीं आम्हालाच माहित ! दुसरा प्रश्न आम्हीं विचारणार तोंच सज्जनानें आपल्या पत्नीशीं अशा अविर्भावानें

बोलण्यास सुरुवात केली कीं, जणू कांहीं त्यांचें अवधान आतां इतरत्र जाणेंच शक्य नाहीं !

उभे राहून राहून आमचे पाय आतां अगदीं भांडून रजा मागण्याचे बेतांत आले होते ! डोकेंहि जडजड पडूं लागलें होतें ! मोठें धाडस करून, आम्हीं त्या पति-पत्नी संवादांत, तृतियभूमिका स्वीकारून म्हणालों, " थोडी रिकामी जागा आहे कां तुमच्या बाकावर ? "

आमचेकडे न पाहतांच, अर्धएक मिनिटानें आकाशवाणी झाली; 'नाहीं !'

' आपण थोडे आपले पाय आवरून ध्याल तर जागा होऊं शकेल मला बसण्यापुरती ! किर्लोस्करवाडीपर्यंत जायचें आहे मला ! " आम्हीं पुन्हां शिरघुसवेपणा केला !

सज्जन पडल्यापडल्याच उद्गारले, "मला मोठें आश्चर्य-वाटतें; तुम्ही चांगले सुशिक्षित दिसतां न् तुम्हाला शिष्टाचारहि कळत नाहींत कसे ? आम्हांला सुद्धां नागपूरपासून बसावें लागलें आहे ! तो बेंच आहे न आणखी ! तिथं करा जागा थोडीबहुत ! अहो ! हा प्रवास आहेऽ!"

आम्हीं चकितच झालों ! सज्जनानेंहि पुन्हां श्रीमतीशीं गप्पा सुरू केल्या ! पुन्हां गाडी चालू ! आम्ही ' पाटीवरी पाय, खिडकीवरी हात ' ठेऊन उभे ! अन् हें सुसंस्कृत जोडपें गप्पांत दंग !

आणखी ५।६ तासपर्यंत आम्ही त्याच स्थितींत उभे, अन् सज्जनदांपत्य अगदीं सकलैश्वर्यसम्पन्नतेंत निर्विकल्प निर्विकार अवस्थेंत पहुडलेले !

अखेर देवळाली स्टेशन आलें; तेव्हां ते सज्जन हळूच उठून बसले ! श्रीमतींहि उठून बसल्या ! सामानसुमानांची व्यवस्थित बांधाबांध झाली !

आम्ही आतांपर्यंतच्या योगसाधनानें स्थितप्रज्ञावस्थेप्रत पोंचलों असल्यानें, आम्हांला त्यांत सुखदुःख वाटण्यासारखें कांहींच नव्हतें !

जणू काय आमचा उद्धार करण्याच्या अभिनिवेषानें हे भले गृहस्थ, आमचे-कडे बघून स्मित करीत म्हणाले,--

" बसा आतां—किंवा आरामशीर झोंप घ्या ! तुम्हाला अजून कल्याण-पर्यंत जायचें आहे ! मोठा त्रासदायक हं आगगाडीचा प्रवास !"

आमचे कान, त्या शब्दांचें आदरातिथ्य करण्यास मुळींच तयार नव्हते ! आम्ही कांहींच बोललों नाहीं अन् आमची समाधि सोडून त्या जागेकडे गेलोंहि नाहीं !

पुन्हां हा सुसंस्कृत (?) सुशिक्षित (?) सिव्हिल (?) सद्‌गृहस्थ (?) उद्‌गारला—" या बसा; आतां चांगली मोकळी जागा झाली आहे तुमचे-करितां ! "

देवळालीचा प्लॅटफॉर्म आला न् गाडी थांबली, तेव्हां आम्हीं त्या सद्-गृहस्थांना म्हणालों, " तुम्हाला लिहितां वाचतां येतच असेल नाहीं कां ?" गृहस्थ आश्चर्यचकित मुद्रेनें पाहूं लागला !

आम्हीं पुढें म्हणालों,—" कृपा करून, मी सांगतों तेवढा मजकूर आपण आपल्या नोटबुकांत लिहून घ्या; अन् अर्थ आपणाला न कळेल तर कुणाला तरी विचारा,

" इल्म है कुछ और शै, आदमीयत् और शै ।
कितना तोते को पढाया, पर वो हैवाँ ही रहा ! "



# शेतकऱ्यांचा कैवारी : : : :

सकाळीं ८॥ चा सुमार होता. तोंड धुवून मुलाबाळांसह मी स्वयंपाक-घरांतच चहा घेत बसलों होतों; तेवढ्यांत कारकुनानें जवळच्या खेड्याचें एक कूळ आल्याचें सांगितलें. " दिवाणखान्यांत बसवा " असें सांगून मी माझ्या बशींतला चहा एका घोटांत संपविला. बेबी माझ्या उजव्या बाजूला होती. तिच्या बशींतला चहा निवून गार झाला तरी ती आज त्याकडे मुळींच लक्ष देईना. माझ्या बशीबरोबर आपली चिमुकली बशी बिनचुक रिकामी करणारी बेबी, आज निराळ्याच बाबतींत गुंग होती. कालच नवीन आणलेलें ' धांवतें कुत्रें ' ती खालीं ठेवीना. रात्रीं त्यालाच हातीं घेऊन ती झोंपली अन् उठता-क्षणींच तिचा हात प्रथम त्या खेळण्याच्या किल्लीवर गेला. तिची गम्मत करावी म्हणून मी तिच्या बशींतला अन् कपांतला चहा माझ्या बशींत घालून तो पिऊन टाकला. पण बेबीला मात्र कशाचाच पत्ता नव्हता. ' चला बेबी; चहा झाला, आतां आपण पत्र वाचूं " असें म्हणून बेबीला मी माझें बोट दिलें. ती पण खरोखरच उजव्या हातीं कुत्रें घेऊन माझ्या अगोदरच उठून उभी राहिली. तिच्या एकाग्रतेनें मी थक्कच झालों. पण तिचें कौतुक करायला मला वेळ होता कुठें ! ' हिला चहा पाज ' असें उषेला सांगून मी दिवाण-खान्याकडे निघालों. मागच्या दारानें आंत येऊन टेबलावरच्या पानदानांतील वेलदोडा मी तोंडांत टाकला अन् खुर्चीवर बसलों. जरा सोईचें वाटलें म्हणून मी डावा पाय खुर्चीवर घेतला. समोरच्या टेबलावर असलेल्या पत्रांच्या ढिगा-कडे माझी नजर गेली. उजवा हात देखील नजरेच्याच मागोमाग निघाला; पण इतक्यांत एका इसमानें आंत येऊन माझ्या खुर्चीवरून खालीं लोंबकळत असलेल्या पायाला मिठीच मारली. त्याच्या पेहरावावरून तो शेतकरी दिसत होता. 'तुम्हींच माझे मायबाप. तारा नाइतर मारा.' त्याच्या येवढ्याच शब्दावर मी त्याला थांबविलें. प्रथम त्याला दोन्हीं खांद्याला धरून मी बाजूला सारलें. " घाबरूं नका. काय तें सांगा तरी प्रथम." असें म्हणत मी सोगा

त्यावरून परत खुर्चीवर बसलों. तो पण पलीकडच्या भिंतीला टेकून दारा-जवळच बसला. कुळांची रहदारी नऊ साडेनवानंतर आमचेकडे सुरू होत असल्यामुळें दिवाणखान्यांत मी, माझा कारकून अन् तो इसम येवढेंच होतों.

आकोल्यासारख्या जिल्ह्याचें ठिकाणीं मी गेलीं सात वर्षे वकीली करीत आहे. आसपासच्या खेडयापाडयांतील कितीतरी केसी माझ्याकडे आल्या; पण त्यामुळें माझ्या खिशांत केसीगणिक भर पडत होती अशी कल्पना कुणी करून घेऊं नये. डॉक्टरकीच्या धंद्यांत ज्याप्रमाणें पोट भरून उपकार करायला वाव असतो, त्याचप्रमाणें तो वकिलींत पण आहे हें मला बऱ्याच अनुभवानंतर कळलें. दोन वेळेच्या जेवणाची ज्यांची सोय नसते, अशांच्याच मागें त्यांच्या अज्ञानामुळें म्हणा अगर आसपासच्या परिस्थितीमुळें म्हणा रोगराथी हात धुवून लागलेली दिसते. अशा रोग्यांकडून मिळकतीची अपेक्षा समंजस डॉक्टर करीत नसतो. आणि श्रीमंत कूळ आल्यानंतर उभें कापल्याखेरीज सोडत नसतो. तीच स्थिति वकिलींत पण कमीजास्त प्रमाणांत आहे. समाजांत राहिल्यानें सर्वांशीच संबंध येतो. त्या न्यायानें जरी शेतकरी आपलें जीवन शक्य तेवढें स्वावलंबी ठेवण्याचा प्रयत्न करीत असला तरी त्याच्या खेडूत भावबंधाप्रमाणेंच शहरीं लोकांबरोबरदेखील त्याचा संबंध आल्याखेरीज रहात नाहीं. शिवाय बाजार-पेठा शहरच्याच असल्याकारणानें शेतकऱ्यांचे शहराखेरीज भागत नाहीं. शेतीचा माल विकणें अन् वर्षाची पोटगी खरीदणें ह्या दोनच जर क्रिया घेतल्या तरी त्यांत शेतकऱ्याच्या उभ्या संसाराचें सार निदान शहरीं माणसाच्या दृष्टीनें तरी येईल. ह्या त्याच्या व्यवहारांत शहरांतील अडते—दलाल, शिपाई, पट्टेवाले, मुनीम, कारकून, दुकानदार, कारखानदार, शेटजी अन भाटे अशा सर्वांशीं त्यांचा संबंध येतो. कोळ्याच्या जाळ्याप्रमाणें ह्यासंबंधाचें एक जाळें बनतें. पण हे मानवी-संबंध असल्याकारणानें फार घोटाळ्याचे अन् दूरवर परिणाम करणारे असतात. इतके कीं ह्या शहरीं जाळ्यांत सांपडलेला शेतकरी—कोळी शेवटीं त्यांतच गुरफटून मरतो. अशा गुंतागुंतीच्या संबंधांत त्याचें कित्येक ठिकाणीं नडतें आणि मग तो आमच्या अशीलाप्रमाणें माझ्यासारख्या एखाद्या वकी-लाचे पाय धरतो. हा प्रकार माझ्या नेहमींच्या अनुभवाचा असल्यामुळें मला

आजच्या प्रसंगाचें तेवढेसें वाटलें नाहीं. कोर्टकचेरीबाबत अडचणींत सांपडलेला तो एक शेतकरी आहे हें माझ्या ताबडतोब लक्षांत आलें.

त्याच्या डोकीला कशीतरी गुंडाळलेली पागोटी होती, ती रंगानें लाल होती अन् तिच्या दसडया बाहेर आल्या होत्या. अंगांत एक मांजरपाटाचें बांडीस होतें. तें पण छातीवर अन् पाठीवर फाटलेलें होतें. दाभणकांठी दांड भरलेलें धोतर गुडघ्याच्या किंचित् खालीं घोळ येतील अशा रीतीनें तो नेसला होता. त्याच जोडींतलें दुसरें पान त्यानें खांद्यावर टाकलें होतें. वेळेवर जसा दुपट्टया-सारखा त्याचा उपयोग त्याला होई, तसाच आंथरायलादेखील होत असे. त्याच्या मिशा भरदार होत्या, अन् दाढी पण बरीच वाढलेली होती. त्याचा चेहरा चिंताक्रांत अन् थोडासा भेदरल्यासारखा दिसे. ‘ कोण्या गांवचे तुम्हीं आणि काय झालं ?’ ह्या माझ्या प्रश्नांसरशी त्यानें आपल्या मोडक्या तोडक्या शेतकरी भाषेंत आपली हकीगत सांगितली.

‘ काय सांगू वकीलसाहेब, ह्या खुशालचंद शेटजीनं गयाच कापला माह्या. तीन वर्स झालें. तीन इसा रुपये पेरनीच्या ववताले नेलते. त्यावर दोनदां चार चार इसा रुपये वापस देले. आखीन एकदा दोन इसा याजाचे देले. अन् तरी चंडायानं माह्यावर फिऱ्याद केली. हे पहा संमन कालच बजावलं बेलीफानं माह्यावर. पन दुस्मानानं सांगावं त खरं कीं मले इतके रुपये पाह्यजत असं. म्या माह्या संसाराचं वाटोयं करून त्याची भरपाई केली असती; पन चंडायानं माह्या अब्रूले डाग लावला. काल आमच्या गांवांत मोठी सभा झाली. खुशालचंद शेटजीले गांवांतल्या साऱ्या लागनदाराइन फुलाच्या माया घातल्या. म्याही एक माय घातली अन् पायावर डोक्स ठेवून ‘ मले वाचवा ’ असी इनंति केली. पन त्या चंडायाले माही कुठली कीव येईल. कोन्या जल्माचा दावा साधुला कायजुन चंडायानं ! आतां माही अब्रू राखा. मी आजपावतर कोरटाची पायरी नाहीं चढलो पहा वकीलसाहेब— ”

त्याला अजून बोलायचेंच होतें. पण येवढयांत दारावर वर्तमानपत्रवाला मुलगा येऊन ओरडला. ‘ सत्याग्रहाची धामधूम ! खुशालचंद शेटजींना अटक !’ एक अंक दारांतून आंत टाकून तो निघून गेला, कारकुनानें तो आणून

माझ्या टेबलावर ठेवला. 'प्रजापक्षा'चे मुखपृष्ठावरच आकोल्याचे प्रसिद्ध कॉंग्रेसकार्यकर्ते खुशालचंद यांचा फोटो होता. मोठया अक्षरांत—

**शेतकऱ्यांचा कैवारी व प्रसिद्ध कॉंग्रेसपुढाऱ्याला जंगलसत्याग्रहाद्दल अटक.**

असा मजकूर होता, व खालीं खुशालचंद शेटजीच्या कार्यांचा आढावा दिलेला होता. त्याचा त्रोटक भाग असा—

" श्रीमंत खुशालचंद शेटजींचें आजपर्यंतचें सर्व आयुष्य समाजकार्यांत गेलें आहे. शेतकऱ्यांच्या हिताची त्यांना अत्यंत कळकळ वाटते...खेडोपाडीं दौरे काढून शेतकऱ्यांच्या गैरसोयी दूर करण्यांत त्यांनीं आजपर्यंत नेहमींच सुख मानलें आहे. शेतकरी समाजाची त्यांनीं केलेली सेवा निरलस बुद्धीनें केली आहे. त्यामुळेंच खेडोंपाडीं त्यांचा सर्वत्र सत्कार होतो. श्री. खुशालचंद शेटजीसारखें उत्साही, त्यागी कळकळीचे अन् एकनिष्ठेनें समाजसेवा करणारे कार्यकर्ते आपल्या शहरांत आहेत, त्यावरून आपल्या देशाला भरभराटीचे दिवस लवकरच दिसणार यांत शंका नाहीं. "

मी वर्तमानपत्र टेबलावर ठेवून दोन्हीं हात तोंडावर नेले व डोळे मिटले.



# तम्बूची दुनिया अन् दुनियेचा तम्बू ! : :

केवढा विशाल तो तम्बू ! अन् त्यांत इतका उंच–उंच–उंच होता तो पाळणा; कीं तेथून जर जमिनीवर कुणी पडेल, तर तो देह कुणाचा हें सुद्धां ओळखायला येणार नाहीं ! नऊदहा महिन्यांचें मूल, त्या पाळण्यावरून दुसऱ्या तितक्याच उंचीच्या पण समांतर पाळण्याकडे नारळासारखें फेंकलें जाई; व दुसऱ्या पाळण्यावरील पाय अडकून बसलेला वस्ताद त्या मुलास आपल्या पायांवर झेलून घेई ! तेथून तें मूल पुन्हां पहिल्या पाळण्यावर फेकलें जाई ! इतका भयानक व विभीषण देखावा दिसायचा तो कीं, डोळे उघडून तो पाहण्यापेक्षां डोळे मिटून पाहण्यांतच माणूसकी वाटे ! साधी कांचेची बाटली, मातीची बाहुली, चहा पिण्याचा कप अथवा बशी, या पाळण्यावरून दुसऱ्या पाळण्यावर भिरकावून देण्यास आमची हिंमत व्हायची नाहीं ! अन् तें ९-१० महिन्यांचें मूल; गोरें गोरें, रेशमांपेक्षांहि मृदु, गोंडस, नीटस, नाजूक, रेडियमचा कणच तो ! कुणातरी आईबापांचेंच असेल तें ! अगदीं बिनधोक या पाळण्यावरून त्या पाळण्यावर रबराचे चेंडूसारखें फेकलें जात होतें ! कधीं कधीं ते रडायचें ! तेव्हां त्याचा वस्ताद त्याला एकदां दोनदां थापटायचा थोपटायचा, नि पुन्हां जों भिरकावयाचा तों अगदीं अस्मानांत ! त्या मुलाला काय ठाऊक कीं मला कां म्हणून असें फेंकतात ! त्या जीवाला काय माहित कीं मला कां म्हणून असें भिरकावितात ! पोटाच्या आगीसाठीं ? घासभर अन्नासाठीं ? दोनतीन वेळच्या चहासाठीं ? कशासाठीं, त्याला काय ठाऊक ?

लक्षावधि मधमाशांना आगीच्या जाळानें जाळून टाकून, त्यांनीं आपल्या पिलांकरितां थेंबथेंब नव्हे कणकण गोळा केलेला मध, आपल्या डब्यांत भरून ठेवणारा ' ज्ञानी मनुष्य ' असें कां करतों तें मधमाशांना काय ठाऊक ! गाईच्या आचळांला लागलेल्या पाडसाचें तोंड बाजूला सारून, तिचें दूध आपल्या भांड्यांत घाईघाईनें दोहून घेणारा ' ज्ञानी मनुष्य ' असें कां करतों

तें गाईना काय ठाऊक ! दिवसभर वानरीच्या पिलांपासून तिला अलग करून ‘ मार लंकेची उडी, मार लंकेची उडी ’ असें करीत, ‘ ज्ञानी मनुष्य ’ तिला कां म्हणून साऱ्या गांवांत फिरवितो तें त्या वानरीला काय ठाऊक ? पण मनुष्य म्हणे फार ‘ ज्ञानी ’ ! त्याला हें सगळें ठाऊक असतें ! ‘ क्षुद्रां पशु-पक्ष्यांची काय कथा, पांचही महाभूतें । ज्ञानबळें आकळुनी केलें ‘ मनुजें ’ स्वदाससम त्यांतें ’ असा हा मनुज, असा हा ‘ ज्ञानी मनुज,’ काय करणार नाहीं ! मनुजांनींच मनुजांच्या ज्ञानाची ही टिमकी वाजविली म्हणून बरें ! एखाद्या मधमाशीनें, एखाद्या गाईनें, एखाद्या वानरीनें, एखाद्या सर्कशींतील तान्ह्या बाळाच्या आईनें जर ‘ मनुजा ’च्या लायकीचें सूत्र रचलें तर तें कसें असेल ! अगदींच निराळें, अगदींच उलटें ना !

असाच एक ‘ज्ञानी मनुज’ त्या मुलाला अस्मानांत भिरकावीत होता, व सभोंवार बसलेले अनेक ज्ञानी जीव कडाड्कडाड् टाळ्या वाजवीत होते ! जसजसा टाळ्यांचा प्रचंड कडकडाट व्हावयाचा, तसतसा त्या मूलफेक्या वस्तादास अधिकाधिक पुरुषार्थ वाटावयाचा ! व जसजसें तें मूल अधिकाधिक भीषणतेनें फेंकलें जायचें तसतसा ज्ञानीपरीक्षकांनीं व प्रेक्षकांनीं बसल्या-बसल्या अधिकाधिक टाळ्या वडवून प्रचंड कडकडाट करावयाचा ! हा क्रम सारखा चाललेला होता ! प्रेक्षक रंगून गेले होते नि वस्तादहि चढून गेला होता ! अन् तें बाळ ? तें इकडून तिकडे फेंकलें जात होतें ! तंबू अगदीं निनादून गेला होता शाबास शाबास अन् वाहवा वाहवाच्या ललकाऱ्यांनी !

त्या आनंदोत्सवांत वस्ताद कुठें चुकला कुणास ठाऊक; त्याचा ‘बॅलन्स’ कसा फिसकटला कुणास ठाऊक; त्याचा तोल कसा गेला कुणास ठाऊक; वरच्या दांडीवरून, अगदीं अस्मानांतल्या दांडीवरून, मूल फेंकतांना वस्तादाचे पाय एकदम घसरले व मग काय !......? मुलाचें तर चूर्णच झालें. अन् वस्ताद ? त्याला हॉस्पिटलमध्यें पोंचविण्याची कोण धांदल ! एकदम ट्रान्स्फर सीन ! एकदम विपण्णतेचें वातावरण !

* * * *

त्या तंबूतून रांगांच्या रांगा पाय काढूं लागल्या ! थोड्याच वेळांत तंबू

जवळजवळ रिकामा झाला ! अगदीं ' फुल टेण्ट् ' चा ' पुअर टेण्ट् ' झाला ! वाटेनें जातांना ' सुशिक्षित ' ' सुसंस्कृत ' ' संभावित ' ' सज्जन ' आपापसांत बोलूं लागले—

" यांनीं एवढें हें धाडस करायला नकोच होतें मुळीं ! अगदींच भीषण कार्यक्रम नाहीं तर काय ? आपल्याला तर अगदीं बघवत नव्हतें बुवा तें दृश्य ! आणि अशा वेळीं आपल्यालासुद्धां उगीचच हेलपाटे नि सरकारी साक्षीचे झटके व्हायचे ! ठीक झालें, आपण निघून आलोंत ! ' कुत्ता जाने, चमडा जाने ' ! त्या सर्कसवाल्याला मात्र कांहीं तरी होईल अं......—? "

" आजच्या या अपघातानें आपले पैसे घालविले मात्र; दुसरें काय ! यांत दयामाया तरी काय दाखवावयाची ? हा व्यवहार आहे ! तुम्ही आमच्यापासून पैसे घेतां, खेळ पूर्ण दाखवायलाच पाहिजे. करता येत नव्हता प्रयोग तर सर्कसच काढावी कशाला ? लोकांचे नुसते पैसे उपटायला ? म्हणे ' आमचे नुकसान झालें, तेव्हां सज्जन प्रेक्षकांनीं आजच्या दिवस आम्हांला क्षमा करावी ! ' यांत कसली आली आहे क्षमा ! आमचे पैसे उपटतांना कांहीं कसें वाटलें नाहीं ? उद्यां फुकट खेळ थोडाच दाखविणार आहेत !—"

" माझ्यातर अंगावर अगदीं कांटाच उभा राह्यचा बाई तें बघतांना ! किती ग नाजूक मूल तें ! मेले पोटासाठीं काय करतील याचा नेमच नाहीं ! मला तर वाटलं कीं, अगदीं कोर्टात जाऊन एक साक्षीदार म्हणून साक्ष द्यावी कीं,......पण म्हटलं जाऊं द्या...उगीचच नसती उठाठेव कशाला ! असले हे पोटभरू यायचे, नि असलीं भलभलतीं धाडसें करून पैसा उपटायचे ! तिथं कुणाकुणाकरितां दयामाया दाखवायची नि हळहळायचं ! दुष्ट—मेले—स्वार्थी नुसते... ! "

" काय ग्रँड फीट वाटायची रे ती अगदीं ! साल्यांना कांहीं भीतीच वाटायची नाहीं मुळीं ! तीच उडी जर त्या तिकडच्या बारवरनं अशी कर्व्ह घेतली असती, तर हा ॲक्सिडेण्ट् इतका डेंजरस झालाहि नसता ! पण बुद्धीच्या नांवानें शून्य लेकांचे ! मवाली नुसते ! नुसत्याच कोलांट्या उड्या मारण्या-

पलीकडे बुद्धी गेली असती तर असले भुताटकी-प्रयोग दाखवून पोटें कशाला जाळलीं असतीं यांनीं......!"

*           *           *           *

माझ्या डोळ्यांपुढें पुन्हां तें तंबूंतील चित्र उभें राहिलें! त्या टाळ्या! तो जयजयकार! त्या ब्रेव्हो ब्रेव्होच्या ललकाऱ्या! त्या शाबासक्यांचा कल्लोळ! त्या वाहवावाहवाच्या गर्जना! आणि ती तंबूमधील दुनिया!

एक जुना शेर आठवला त्या वेळीं न् मी सुन्न झालों—

"दुनिया नहीं, ये दो अनियाँ है। इन् दोनो को तूं सभाल—!"



# भोळा भाव

शिवराम वरळीच्या सिमीट चाळींत राहात होता. पांच रुपये भाड्याची एकच खोली. त्यांत नवरा-बायको राहात असत. मुंबईला येऊन त्यांस तीन वर्षे होऊन गेलीं, पण त्यांच्या घरीं त्यांचेशिवाय आणखी कुणी आलेलें नव्हतें या अवधींत. रक्तामासाचा गोतावळा श्रीमंताप्रमाणें गरिबांना देखील असतोच. पण तोंडदेखल्या ओळख होण्याची मिरासदारी केवळ श्रीमंतांचीच. शिवराम काय बोलुन-चालून 'खटारा' गिरणींत दोन साचे चालविणारा मजूर. त्यांत देखील रोज काम चालू राहावें म्हणून मुकादमाची मर्जी सांभाळावी लागे त्याला. मुकदमाची मर्जी म्हणजे काय चीज आहे तें त्यांच्या हातांखालीं काम करणाऱ्या मजुरांनाच समजतें. पंधरवडा अखेर हातीं येणारे बारा पंधरा रुपये हीच काय ती शिवरामाची मिळकत. सखु मात्र घरींच असे. हें कुटुंब मूळचें वऱ्हाडांतलें. वऱ्हाडचें कुटुंब गरीबीतलें जरी असलें, तरी त्यांतील स्त्रियांना कामाला पाठविणें, माणसांना कमीपणाचें वाटतें. शिवराम देखील ह्या नियमास अपवाद नव्हता. सखूनें दोन्हीं वेळचा स्वयंपाक करावा अन् घराची नीट व्यवस्था ठेवावी येवढीच त्याची अपेक्षा होती. नवरा-बायको सुखासमाधानानें राहातात असें शेजाऱ्यांना वाटे. वाटे असें म्हणायचें कारण असें कीं, संसारी-जीवनाच्या पूर्तीचें द्योतक जो तिसरा जीव त्याची त्यांच्या संसारांत उणीव होती. लग्न होऊन पांच वर्षें झालीं तरी त्या जोडप्यास संततीचा योग आला नव्हता. सखू तर संततीसाठीं हपापलेली होती. 'सीतामातेस नवस करा' असा निरोप सांगून तिनें गेलीं पांच वर्षें नियमानें दहा दहा रुपये माहेरीं पाठविले आणि उपासतापास तर नेहमीचेच होते. लग्नानंतर दोन वर्षें, दोघांनाही संसार सुरस वाटला. शिवराम त्या वेळीं दिगरस ह्या आपल्या जन्मस्थळींच शेत-मजूरी करून पोट भागवी; पण मुंबईत नशीब काढायला वाव आहे हें ऐकून व मुंबईला अगोदर येऊन छापखान्यांत नोकरी मिळविलेल्या एका गांवकऱ्यानें भर दिल्यावरून, शिवराम

येथें आला. त्याच्या अपेक्षेप्रमाणें त्याला गिरणींत काम मिळालें. या गोष्टीस पंधराच दिवस झाले असतील नसतील तोंच; एक अनपेक्षित प्रसंग घडला. शिवरामला अशी अनपेक्षित बातमी कळाली कीं; गणपत आपलें छापखान्यांतलें काम संपवून सायंकाळचें वेळीं घरीं परत येतांना, मोटारखालीं सांपडला अन् तत्क्षणींच त्यानें हें जग सोडलें! शिवरामला भडभडून आलें, त्याचें चित्त कशांतच लागेना, त्याच्या मनांत भलभलतेच विचार येऊं लागले. मीलमधून घरीं येतांना, रस्त्यावरच त्याला हा वृत्तांत कळाला होता. रोजच्यापेक्षां शिवराम आज खिन्न अन् उदास आहे ही गोष्ट सखूच्या नजरेंतून सुटली नाहीं. मोरीवर पाण्याचा गडवा भरून ठेवीत ' चला, पाय धुवा !' असें ती शिवरामला उद्देशून म्हणाली, व पाट मांडून ताट करायला लागली. आपण काय करतों याचें शिवरामास भान नव्हतेंच; पण नेहमींच्या संवईमुळें, त्याच्या हातांनीं त्याच्या डोक्यावरील टोपी काढली अन् खिळयाला ठेवली. तेच हात अंगांतला सदरा काढायला विसरले नाहींत. पायांनीं शिवरामाला मोरीकडे नेलें. तेथें उजव्या हातानें पायावर पाणी घातलें. पायांनीं परत शिवरामास पाटावर नेलें. शिवराम पाटावर बसला. उजव्या हातानें भाकरीचा घास तोडून वरणांत बुडविला व तो तोंडांत ठेवला. पण यापुढें त्याचे अवयव काम करीतनासे झाले. त्याचा घास खालीं उतरेना.

' काय म्हनत मुकादम ? ' सखूनें सुरुवात केली.

' आजकिनी फार खराब बातमी आली. गनपत .......... " शिवरामाच्या तोंडून शब्द निघेना. त्याच्या डोळ्यांतून धारा वाहूं लागल्या. वास्तविक, गणपत आणि शिवरामाचा फारसा दाट परिचय नव्हता. पण मुंबईसारख्या बकाली वस्तींत आपलें म्हणून म्हणायला शिवरामाला गणपत हेंच एक माणूस, आणि आज तें पण गेल्याचें त्याला कळालें. गणपतच्या मृत्यूची खबर गांवीं कळल्यानंतर त्याच्या सख्ख्या भावालादेखील शिवराम येवढें दुःख झालें नसेल. शिवराम ताटावरून उठला. कोपऱ्यांत सतरंजी होती. तीवर भिंतीला टेकून बसला. त्याला रहावेना. त्यानें दोन्हीं गुढग्यामध्यें आपलें डोकें खुपसलें, व दोन्हीं हातांनीं गुढग्यांना विळखा घातला.

सखूनें वाट बाजूला उचलून ठेवलें. पाट उचलला अन् तेथेंच आंथरूण घातलें.

× × × ×

आज शिवरामच्या कामाचा लागोपाठ तिसरा खाडा दिवस. 'आबा आले!' असें सखूनें सांगितल्याबरोबर अंगावर मूठभर मांस आल्यासारखें वाटलें शिवरामाला परवां. गणपत नंतर गेलीं तीन वर्षें शिवरामानें वनवास भोगला होता. तो सकाळीं उठे, तोंड धुवून आंघोळ करी; न्याहारी करून दुपारी जेवण करी अन् गिरणींत जाई. सायंकाळीं घरीं आल्यानंतरचें जेवण व सखूशीं संसारांतल्या नेहमींच्याच चारदोन गोष्टी करून झोपीं जाई. हाच त्याचा नेहमींचा कार्यक्रम. मात्र गिरणींत रात्रपाळी असली कीं, ह्या कार्यक्रमांतील निरनिराळ्या क्रियांचा क्रम बदले येवढंच. बाकी त्यांत फारसा बदल होत नसे. ह्याच रूक्ष-जीवनांत गेलीं तीन वर्षे काढलीं आयुष्याचीं शिवराम व सखू ह्या जोडप्यानें. मुंबईसारख्या धकाधकीच्या वस्तींत शेजाऱ्यापासून सुखदुःखाचे वेळीं देखील सहृदयतेचा शब्द मिळणें कठीण. जी काय थोडी ओळख होईल ती कामावर, आणि ती सुद्धां पैसासिंगलवाला चहा पितांना अगर पैशायेवढा पानाचा तुकडा खातांना झालेली. गिरणी सुटली कीं कुणीकुणाचा नसतो. त्यामुळें संसार पोटासाठीं आहे, जीवन हे पूर्वजन्मीच्या पापाचा भोग आहे, वगैरे विचार इतर कामगारांबरोबर शिवरामाच्या देखील मनांत ठाणें मांडून बसले होते. अशा त्याच्या वाळवंटीं जीवनांत 'आबा'च्या येण्यानें एकदम वसंताची पालवी बहरलेली दिसली. 'जीवन' हें पूर्वजन्मींच्या कर्मांचा भोग आहे असें भासविणारा त्यांतला कंटाळवाणेपणा गेल्या तीन दिवसांत शिवरामाला कुठेंच आढळला नाहीं. दोन दिवस कसे गेले हें त्याचें त्यालाच कळलें नाहीं.

दिगरसचे 'आबा' आसपासच्या दहा मैलांच्या टापूंत लहान मोठ्यांच्या ओळखीचे. 'आबा' हें त्यांचें खरें नांव नव्हें. त्यांचें खरें नांव सोपानराव. जन्म पाटीलघराण्यांतला. शिवाय गावांत नात्यानें मोठे. त्यांच्या पिढींतल्या

बहुतेक सर्वांचे ते नात्यानें आबा लागत. त्यामुळें अनायासेंच, 'आबा' हें टोपणनांव त्यांना मिळालें. विशेषतः खेडेगांवांत पाटील घराण्यांत न आढळणारी सर्वांशीं मिळून-मिसळून राहण्याची आवड सोपानरावांत होती. पाटीलकी जरी त्यांच्या घराण्यांत होती, तरी ते पाटीलकीवर नव्हते. घरीं तीस-पस्तीस एकर जमीन, एक बैलांची जोडी व एक सालाचा गडी. एवढाच शेतकरी या नात्यानें त्यांचा संसार. आजकाल शेतींत स्वतः अंगमेहनत जरी ते फारसे नियमानें करीत नसत तरी उमेदीच्या वयांत त्यांनीं तीं सर्व कामें केलेलीं होतीं. शिवाय त्यांची जमीन म्हणजे नेमकी एका कुटुंबाला असावी तेवढीच होती. सोपानराव मोठ्या मनाचे, दीर्घ दृष्टीचे व सरळ स्वभावाचे होते. ना कोणाच्या घेण्यांत ना देण्यांत. मात्र गावांतले कोणतेंही सामाजिक कार्य सोपानरावाच्या गैरहजेरींत होत नसे. महादेवाचा भंडारा असो; मारुतीचा जन्म असो; मृदंगाचें भजन असो अगर लग्न-कार्य असो; त्यांत सोपानराव जातीनें हजर नसले कीं,लोकांना चुकल्यासारखें वाटे.सौभाग्यवतींत जें कुंकवाचें स्थान तेंच गांवकार्यांत सोपानरावाचें होतें. कारणही उघडच होतें. त्यांचें शिक्षण जरी मराठी सात इयत्तापर्यंतच झालेलें होतें, तरी सामान्य माणसांत न आढळणारा बुद्धीचा तल्लखपणा, दृष्टीची व्यापकता, कार्याबाबतचा जिव्हाळा अन् सर्वांच्या भल्याची मनापासूनची इच्छा; ह्या व इतर गुणांबरोबरच स्वतः अंग मोडून काम करण्याची त्यांची नेहमीची पद्धत होती. हेंच सोपानरावांचें भांडवल. पण त्यामुळें 'आबा' ह्या शब्दांत एक पकारची जादू भरलेली वाटे गांवकऱ्यांना. ज्यांत 'आबा', ते काम फत्ते असा समज झाला होता बिचाऱ्यांचा. तरुणांना तर 'आबा' ह्या वृक्षाच्या सावलीइतकें आल्हाददायक दुसरें कांहींच वाटेना. चूक झाली तरी शांतपणें जवळ बोलावून समज पाडणें अन् 'हरकत नाहीं! काम चालू ठेव!' असे उत्साहाचे शब्द उच्चारून त्याच्या पाठीवर थाप मारणें ही आबाची नेहमींची धाटणी! आणि याशिवाय तरुणांना हवें तरी काय असतें? सारांश, वैयक्तिक द्वेषानें प्रेरीत झालेले चारदोन घमेंडखोर वगळले कीं दिमसच्या लहानमोठ्यांना, गरीब-श्रीमंतांना, बायांबापड्यांना 'आबा' स्वतःचेच आबा वाटत.

सोपानरावांचा वडील मुलगा पुण्याला 'सॅपर्स अँड मायनर्स' मध्यें तीन

महिन्यापूर्वींच दाखल झाला होता. त्याचें कसें काय चाललें हें पाहण्याच्या उद्देशानें नाताळच्या झोनूचा फायदा घेऊन, सोपानराव निघाले. पुण्या-मुंबईच्या आसपास कुणी जवळचें आहे काय, हा प्रश्न सहज त्यांच्या मनाला चाटून गेला. तीन वर्षांपूर्वीं गांव सोडून गेलेला दमदार शिवराम चटकन त्यांच्यासमोर दिसला. शिवरामाची भेट घेण्याचें त्यांच्या मनानें निश्चित पण केलें. शिवरामचा मामेभाऊ आकोल्याला होता. गवंडीकामांत तो हात-खंडा होता. त्याच्या कसबामुळें त्याला तेथेंच भरपूर कमाई होती. सोपान-रावांनीं अकोल्याला जावून नामदेवकडून शिवरामचा पत्ता घेतला, व घरची सारी व्यवस्था लावून ते सोमवारीं निघाले. धाकटी अनुसया मात्र त्यांचा घोळ धरून होती. 'दादाच्या घरीं मला न्या' हा तिचा हट्ट. वय सहा वर्षांचें. शिवाय अनोळखी रस्त्याचा प्रवास. त्यामुळें सोपानरावांना नेहमीं-प्रमाणें अनुसयाचा हा हट्ट पुरा करणें शक्य झालें नाहीं. तुला खेळणें आणतों, भातकें आणतों, झगा आणतों आणि शेवटीं तर दादालाच आपल्या घरीं आणतो; ह्या एकापेक्षां एक वरचढ अशा बापूंच्या आमीषांचा तिच्यावर कांहींच परिणाम झाला नाहीं. बापू सकाळीं जाणार हें रात्रीं कळल्यामुळें ती रात्रीं आईला बिलगुन झोपली आणि तिच्या त्या युक्तीचा योग्य तोच परिणाम होऊन, आई उठल्याची चाहुल तिला लागतांच, तीसुद्धां खडबडून उठली. सोपानरावांपूर्वीं अनुसयाचीच पुण्याची तयारी सुरू झाली. शेजारच्या सरीच्या आईजवळ जीवून केस विंचरून घेणें, आपल्याच हातानें घंगाळांतल्या पाण्यानें आंघोळ करणें अन् नंतर नवा परकर अन् पोलकें घालून बापूंसाठी संभू सालदारानें तयार केलेल्या छकडयाच्या आसपास रुंघळणें येथ-पर्यंत तिची मजल आली होती. प्रत्यक्ष जेवणाचे वेळीं तर बापूंच्याच ताटांत बसून त्यांचें अर्धें जेवण होतें न होतें तोंच अनुसयानें संपविलें. पण तिच्या साऱ्या कारवायांचा कांहीं उपयोग व्हायचा नव्हता. तिला रडत ठेवून संभूला छकडा हाकण्यास सोपानरावांनीं इशारा दिला.

\+ + +

'आबां'चें येणें शिवरामास प्रत्यक्ष देवच घरीं येण्याइतकें आनंददायी वाटलें. 'जा, पण सांभाळून अस!' हा, गांव सोडून येतांना 'आबा'नीं

दिलेला निरोप, त्याच्या कानावर पुन्हां आदळल्याचा त्याला भास झाला. त्याला जीवनांत कांहीं करण्यासारखें आहे असें वाटूं लागलें, आपल्या नेहमींच्याच खोलींत त्याला प्राण असल्यासारखें वाटलें. आबांची आंघोळ, त्यांचा चहा, त्यांचे जेवण व त्यांना मुंबई दाखविणें ह्या गोष्टींत तो इतका उत्साह दाखवीत होता कीं, हा रोजचा शिवराम आहे असें शेजाऱ्यांना वाटेचना. त्याची ती धांदल तर त्यांना त्याचा कायापालट झाल्याचें द्योतक वाटलें. साहाजिकच ज्या 'आबा'च्या येण्यानें येवढा क्रांतिकारक फरक घडून आणला त्याच्याबद्दल शेजाऱ्यांत देखील कुतुहल उत्पन्न झालें. शिवरामानें गिरणींत जावून मुकदमाची मनधरणी केली; त्याच्याकडून थोडे पैसे उसने आणले; तीन दिवसांची रजा मिळविली; अन् तीन दिवसांत 'आबां'ना सारी मुंबई कशी दाखवितां येईल याबद्दल मनांत एक आराखडा देखील काढला. आबांच्या सहवासांत शिवरामाचे दोन दिवस कसे गेले हें त्याला कळलेंच नाहीं. सखूची देखील तीच स्थिति. सासरच्या सासुरवासास कंटाळलेली सून, माहेरच्या माणसाला पाहून जितकी हुरळते तितकीच ती पण हुरळली होती. ती भाजी करीत असो नाहींतर चपाती, स्नानाचें पाणी काढत असो नाहींतर पाट मांडत असो; मीं हें 'आबाजी'साठीं करतें याचा तिला अभिमान वाटे. आपलें जगांत कोणी आहे ह्याचा जवळ जवळ पूर्णपणें विसर पडलेलें तें जोडपें. आपुलकीचें, जिव्हाळ्याचें अन् प्रेमाचें 'आबा'सारखें माणूस आल्यानंतर आणखी कशाप्रकारच्या वर्तनाची अपेक्षा करावी त्यांचेकडून ?

'आबा' चा जायचा दिवस उजाडला. सकाळींच दुधवाल्याकडून अर्धा शेर जास्तीचें दूध सखूनें घेतलें व ती खीरपोळीच्या स्वयंपाकास लागली. सकाळच्या चहानंतर मुलाबाळांसाठीं मुंबईचें कांहीं न्यावें ह्या उद्देशानें 'आबा' व शिवराम दादरला गेले, खरेदी संपली. 'कृष्ण-निवास' च्या समोरून जातांना शिवरामानें 'या आबा, चहा घेऊं' असें म्हणत त्यांना हाताला धरूनच तिकडे नेलें. 'शिवराम! आतांच तर घरीं चहा घेतला आपण, विनाकारण पैसे नासूं नये बाबा', आबांनीं समजूत घालण्याचा प्रयत्न केला. 'आबा, आज तर तुम्ही जाणार. उद्यां थोडंच मला म्हणतां येईल चहा घ्या म्हणून—'

आबांना शिवरामच्या मागोमाग जाण्याखेरीज कांहींच सुचलें नाहीं. त्यांनीं चहा घेतला. हॉटेलमधून बाहेर पडतांच मिठाईचें दुकान होतें. तेथून आठ आण्यांची निरनिराळ्या प्रकारची मिठाई घेऊन ' हा पुडा अनुसयासाठीं बरं आबा' असें म्हणत शिवरामनें तो पुडा आबाच्यां खरेदीच्या सामानांत गुंडाळला.

' विनाकारण पैसे नको खर्चूं शिवराम ! पोराबाळांना गांवांत काय भातकं मिळत नाहीं ? ' हें आबांनीं उच्चारलेले शब्द शिवरामाला ऐकायला वेळ कुठें होता ?

' आतां अनुसया चांगली धावत असेल नाहीं आबा ?'

' हो गड्या ! ती तर फार मागं लागली होती. पण म्हटलं अनोळखी रस्त्याचा प्रवास, कुठं करा मुलाबाळांची दगदग. म्हणून नाहीं आणलं मी तिला.'

ते घरीं आले. सखूचा स्वयंपाक तयार होता. खीरपोळीचें जेवण. त्यांत सखू अन् शिवरामाचा आग्रह. ' आबां 'ना आपण घरच्यापेक्षांदेखील जास्त जेवल्यासारखें वाटलें. चूळ वगैरे भरून झाल्यावर पान खाल्ल्यानंतर ताबडतोब निघावयाची तयारी झाली. पण इतक्यांत सखूनें एका ताटलींत दोन केळीं ठेवून ' आबाजी, आजच्या दिवस येवढं खा, ' असें म्हणत ती ताटली त्यांच्यापुढं केली. ' बाई आतांच जेवण झालं ना ! ' असें म्हणत आबांनी ताटलींतील एक केळं उचललें, दुसरं शिवरामानें घेतलें. शिवराम शर्ट घालून निघाला. पांच मिनटांतच चाळीसमोर व्हिक्टोरिया आली. शिवरामनें ' आबा ' ची पेटी अन् बिछाना आंत ठेवला व तो वर आला. आबांनीं फेटा बांधून आपली खादीची शाल खांद्यावर टाकली. बूट घातला पण दाराबाहेर पाय टाकतांना त्यांच्या हृदयांत कालवाकालव होत होती.

' बरं येतो बाई......!...... शिवराम !' असें म्हणत त्यांनीं दाराजवळ येऊन प्रथम सखू व नंतर शिवरामाकडे पाहिलें, पण त्यांना दोघांच्याही गालावर आसूंच दिसले. त्यांनादेखील आवरलें नाहीं. खांद्यावरील शाल डोळ्यांकडे नेत ' सांभाळून रहा बरं दोघं, येथें तुमचं कोणी नाहीं; ' हे शब्द त्यांनीं कसे-बसे

उच्चारले. पण त्यांचा गळा भरून आला. बाहेर व्हिक्टोरियावाल्यानें 'खण् खण् खण् खण् ! असा घंटीचा आवाज केला. 'चला आबा' म्हणून शिवराम आबापुढेंच निघाला. आबा व्हिक्टोरियांत बसले. व्हिक्टोरिया निघाली. ती दृष्टिआड होईपर्यंत तिकडे पहात शिवराम सडकेवर अन् सखू खिडकीशीं उभें होते. शेवटीं 'पों पों' अशा मोटारच्या हॉर्ननें शिवरामाला शुद्धीवर आणलें व तो वर निघाला.



# पाणी ! पाणी ! पाणी ! : : :

" वहिनी ! त्या दिवशींच्या त्या रुबाबदार गृहस्थाकडे बघून माझ्या तर जिवाचं अगदीं पाणी पाणी झालं गडे ! किती ग पाणीदार गृहस्थ तो ! "

" अहो पण वन्सं ! तुमच्याचसं काय पण माझ्यासुद्धां तोंडचं पाणी पळालं त्याला बघून ! खरंच माणसांत पाणी असावं म्हणून म्हणतात तें हें असं ! "

" आणि वहिनी ! त्यांतहि पुन्हां तो त्याच्या गळ्यांतील पाणीदार मोत्यांचा कण्ठा, अन् त्याचे ते पाणीदार डोळे; हें सगळं बघितलं म्हणजे खरोखरच वाटायला लागतं ग, कीं ऐश्वर्य नि सौंदर्य ह्या ऋद्धिसिद्धि इथें पाणी भरताहेत खास ! "

" हं ऽ ! अगदीं तेंच तर मीहि म्हणत होतें ! पण काय हो वन्सं ! असल्या उमद्या गृहस्थाच्या नशीबीं कुणाचं पाणिग्रहण आहे हें तो पिनाक-पाणिच जाणें ! जिच्यांत कांहीं पाणी असेल अशीच राणी देणार त्याला चक्रपाणी ! "

" छट् ! वेडी कुठली ! अग तुझ्या स्मरणशक्तीवरच मुळीं पाणी पडलेलं दिसतंय् मला ! परवांचे दिवशीं आपण बॅक्बेवर समुद्राचं पाणी बघायला गेलों होतों ना ? मग त्या वेळीं आपल्या शेजारचेच बाकावर बसून हेच ते गृहस्थ त्यांच्या मित्रांशीं नव्हते का बोलत; कीं, ' मीं लग्न केलं खरं शारङ्ग-पाणि, पण चार हजार रुपये नुसते पाण्यांत गेले गड्या ! वधूच्या नाकींडोळीं पाणी खळाळतांना पाहिलं, आणि मनाला वाटलं कीं जास्त खोल पाण्यांत कशाला शिरावं ! पण या पोकळ भ्रमानं अखेर माझ्या संसाराचं पाणमातेरं केलं गड्या ' ! "

" हो का ऽ ! अगोऽबाई ! मग तर बिचाऱ्याचा संसार म्हणजे पाण्यां-

तल्या देवळाप्रमाणेंच समजायचा ! ह्यांनीं आपल्या रक्ताचं पाणी करून दिवसभर पोटापाण्याचा प्रश्न सोडवायचा; आणि थकून भागून घरीं आल्यावर सुखाचं तांब्याभर पाणी द्यायलाहि राणी तयार नसायची ! मग, असलं जीवन म्हणजे पाण्यावरलंच नव्हे तर काय !"

"आणि एवढंच नव्हे वहिनी, तर असला जीव एकादवेळीं आजारी बिजारी पडला, तर पाणी पाणी करून मरायचा देखील बिचारा ! वेळीं पाणी पाजायलासुद्धां कोणी मिळायचं नाहीं ! अग ! धन, मान, सत्ता हीं काय, आळवावरलं पाणी ! आत्तां आहे नि क्षणाभरानं नाहीं ! जोंपर्यंत पाणपोई चाललेली असायची, तोंपर्यंतच मित्र नि मैत्रिणी न् आणखिन् दुसरे कोणी, दाराशीं पाणी भरीत असायचे, हा अगदीं जगाचा निर्भेळ नियम. पण एकदां का ही पाणपोई आखंडली, कीं मग त्याच पाणपोईत गळाभर डुंबणारे पाणकोंबडेसुद्धां पाणउतारा करण्यास मागेंपुढें बघत नसतात, हा सर्वांचाच आजपर्यंतचा अनुभव आहे; समजलं कां वहिनी ! हा अनुभवाचा अर्क आहे, पाणी नव्हे बरं कां !"

"खरंच कित्ती कित्ती महत्त्वाचं बोललांत वन्सं ! मनुष्य सातासमुद्रांचं पाणी प्यायलेला असला, तरी एकदां का त्याच्या जवळचं पाणी आटलं; म्हणजे घोटभर पाणी मागायलासुद्धां त्याला साऱ्या जगाचे तोंडाकडे बघावं लागतं ! आणि अशा वेळीं, एके काळीं डोकीवरून पाणी वाळणारे पाणकेसुद्धां, त्या व्यक्तीकडे उपहासाचे दृष्टीनें बघायला लागतात !"

"आणि असंच नव्हे वहिनी, तर अशा संकटाचे वेळीं जर त्या नवराबायकोची जोडगोळी मागेंपुढें रेंगाळणारी असली, तर दोघांच्याहि डोळ्याचं पाणी खळायचं नाहीं कधीं ! पाणचट लोक अशा वेळीं वाहत्या पाण्यांत हात धुवून घेतात तें पुन्हां निराळेंच ! आणि वहिनी, जगाचा असा नियमच आहे ग, कीं एकदां का कुणाच्या नाकातोंडांत पाणी जायला लागलं, कीं लोकदेखील त्या जीवास पाण्याहून पातळ करून सोडतात !"

"खरंच वन्सं ! वास्तविक कुठल्याहि विपद्ग्रस्त मनुष्याचे संबंधांत, 'वाहिलेलं पाणी नि राहिलेली गंगा' असं समजायला हवं ! पण समुद्राचं

घांत पाणी जिथं तिथं कुठून आढळायला ! उथळ पाण्याचा खळखळाटच नेहमीं नजरेला यायचा ! ”

“ खरंच ग वहिनी ! किती मुद्याचं बोललीस म्हणून सांगूं आतां ! तरीच दादा नेहमीं म्हणतो कीं, माझ्या यमुनेच्या पाण्याचा थांग कुणालाहि लागायचा नाहीं इतकं तिचं खोल पाणी आहे म्हणून ! ”

“ इश्श ! पण तुमच्या तोंडाला पाणी सुटल्यासारखं त्यांत काय झालं वन्सं ! ”

“ म्हणजे ? वहिनी, तूं चांगलीच चाहटळपणा करायला लागलीस अं ? अशी का तूं माझ्याशीं थट्टा करायला धजलीस ? पाणी दिलेल्या तरवारीप्रमाणें तूं आपल्या तरवारीच पाणी दाखवायला आज तयार झालीस वाटतं ? लहान-मोठेपणाचीं नातीं तूं पाण्यावरल्या बुडबुड्याप्रमाणेंच समजतेस वाटतं ? कांहींहि झालं तरी तूं अडाण्यांच्या घरांत वाढलेली ! नदीच पाणी तें नदीचंच आणि ओढ्याचं तें ओढ्याचंच ! दादाच्या कानीं मी तुझा हा चढेलपणा घालून त्याला बजावणार आहे कीं, घातल्या पाण्यानं गंगा कधीं वाहत नसते म्हणून ! वात्रट कुठली ! ”

“ पण वन्सं ! मी तरी तुम्हांला घांत असं काय हो म्हटलं ! तिकडून माझेवर रागावणं झालंच तर तुम्ही उलट मध्यस्थी करून तिकडच्या रागाचं पाणी होईल असं करायचं वन्स ! त्याचे ऐवजीं माझ्या एवढ्याशा गंमतीच्या बोलण्याकरतां जर आमचे घरांत पाणी शिरलं, तर मग माझं बापडीचं कसं होणार ! मग, वन्सं ! कराल ना चुकल्याची क्षमा ! ”

“ मी कोण बाई तुला क्षमाबिमा करणार; पण यमुनावहिनी ! पुन्हां लक्षांत ठेव कीं, साजेलसं ल्यावं अन् रुचेल तें बोलावं ! वळचणीचं पाणी आढ्यावर चढूं लागलेलं कसं बरं योग्य दिसेल ?...बरं पण वहिनी, बोलतां बोलतां बराच वेळ होऊन गेला नाहीं का ? पाण्याच्या पुरासारखंच चाललंय आपलं सारखं बरळणं ! त्या पाणीदार गृहस्थावरनं बोलणं निघालं काय नि आपण इथवर पाण्यासारख्या वाहवत आलोंत त्या काय ! मला आतां घरीं

जायला हवं गडे ! ऑफिसांतून येणंसुद्धां होईल इतक्यांत ! तुझं काय: बाई, तूं चांगली नवऱ्याचं पाणी जोखून पाहूला मागं घेत नाहींस ! ”

“ मग; तळें राखील ती पाणी चाखणारच आहे वन्सं !”

× × ×

शेजारील रीडिंगरूममधून—

“ मी घरीं नाहीं असा का तुझा समज आहे यमुने ! मी सगळं ऐकलं आहे बरं का ! करून सगळं करावं आणि पुन्हां, ‘मला तुम्ही अलीकडे पाण्यांतच बघतां’ असं म्हणून गंगायमुनांना पाणी आणावं हें तुझं नेहमींच चाललेलं आहे; पण तूं लक्षात ठेव यमुने, हें असलं सोनेरी पाणी फार दिवस टिकणारं नसतं बरं का ! मी तुझ्यावर कायमचं पाणीसुद्धां सोडून देण्यास तयार होईन एखादे वेळीं ! मूर्ख कुठली ! ताईलासुद्धां तूं आपलं पाणी दाखवायला लागलीस नाहीं का ?

× × ×

विनायकाच्या ह्या गडगडण्यानें, नणंद–भावजयींत चाललेल्या विनोदावर पाणी पडलें ! यमुनेच्या गंगायमुनांना अधिकच पाणी चढलें ! मग काय विचारतां; त्या सरित्प्रवाहाला बंध घालण्याकरितां यमुनेच्या पतिदेवानें मराठी भाषेचें सगळें पाणी खर्ची घातलें ! !

**मराठी भाषेचें पाणी, प्रियेच्या डोळ्यांतील पाणी थांबविण्याकरितां अलीकडे बरेंच खर्च होऊं लागलें;** असें कांहीं पाणीदार लेखक लिहितात, तें पाण्यांत कसें जाईल ! !



## लेकबाय !         :         :         :         :

'—निंघ माह्या सवतच्या सवती ! कैदासनी ! तुह्या मायले पाठोन माह्या पोराचा संसार कऱ्याले ! लंव्ढीनं सयपाक नाहीं शिकोला पोरीले त मंग काढली काह्याले पोरगी ? ........'

जिभेचा पट्टा अखंड चालू होता. कलंकाईचा राग अनावर झाला. ती उठली. लक्ष्मीच्या झिटया धरून एकच झटका मारला तिनें. कोंवळी पोर ती. झटक्यासरशी पटकन् सासूच्या पायाशीं पडली. भिंतीसाठीं चिखल तुडवितात ना, अगदीं तसं तुडविलं कलंकाईनं सुनेला. हात, पाय, तोंड वगैरे कलंकाईचें शाबूत असलेले सारे अवयव लक्ष्मीवर एकदम तुटून पडले. कमालीचा संयम राखून लक्ष्मीनें सर्व सहन केलें. आटोक्याबाहेर गेलेले तेवढेच हुंदके शेजाऱ्यांना ऐकू गेले तिचे. ते नेहमीचेंच होतें. शेजाऱ्यांना तो एक रोजचा तमाशा वाटे. सदामरे त्याला कोण रडे ! पण बिचाऱ्या लक्ष्मीबद्दल कींव येई सर्वांना. मनांतल्या मनांत शतशः शाप अन् शिव्या देत ते कलंकाईला. पण मधें पडण्याची सोय नव्हती. कलंकाई म्हणजे काय प्रकरण आहे तें साऱ्या देगांवकरांना ठाऊक होतें. कलंकाईचें तोंड सर्वांच्या परिचयाचें होतें गांवांत. त्यांत हें पडलें सासूसुनांतलें भांडण. त्यामुळें मधें पडायची कुणाचीच छाती होईना.

एकदां दिवाळीच्या सुटींत नामदेव उमरावतीहून मामाचें घरीं आला होता. स्त्री-स्वातंत्र्याबद्दल त्यानें बरेंच वाचलें होतें. स्त्रियांची गुलामवत् स्थिति दूर केल्याखेरीज समाजाचा तरणोपाय नाहीं, असें त्याला वाटत होतें. स्त्री-शिक्षणाचें बाबतींत कांहीं करण्याचें त्यानें निश्चित पण केलें होतें. कलंकाईचा नवीन सुनेबाबतचा तो प्रकार नामदेवानें प्रथमच पाहिला. त्याच्यानें राहावलें नाहीं.

'काकी, काकी ! सोडा ! काय झालं ?'

'चालरे ! तूं कुठला बाजीराव हायेस ? तुही घरची रांड असील तिच्या

जोळ कर मिजाईस! अथी काय होये तुहं? ह्या चलूवादीचा फार कयवया आला तुले! लंवृटीनं तुह्याशीं लागाबांधा बांधला वाटते दो दिसांत......!'

बिचारा नामदेव! कसा टिकेल ह्या भडिमारांसमोर? आल्या पावलीं परतला अन् त्यानें कानाला खडा लावला. यानंतर रोज तसाच प्रकार चाले, पण आपल्या मुक्कामांत फिरून कधीं तो कलंकाईच्या भानगडींत पडला असेल तर शपथ.

लक्ष्मी मोठ्या पहाटें उठे. पहांटेच्या अधलीभर दळणानंतर तांबडं फुटायच्या आंतच लक्ष्मीची झाडझूड अन् सडासारवण उरकलं जाई. वीस खांबी घर अन् ओसरी सारवून घरायेवढ्याच अंगणांत सडा घालणं, हें सर्व सासूच्या उठण्यापूर्वींच ती करी. आंथरुणांतून उठल्यावर सासूचा पाय पारध्या घरावर पडला असा एकही दिवस लक्ष्मी आल्यापासून उजाडला नव्हता! रात्रीचीं भांडीं घासून स्वतः स्नान करणें अन् ऊन ऊन भाकर अन् कोरड्यास नवऱ्या न् सासऱ्याच्या न्याहारीसाठीं तयार ठेवणें हें लक्ष्मीचें नंतरचें काम. नारायण अंथरुणांतच असे; तरी त्याच्या न्याहरीची भाकर उशीरा होते अशा सबबीवर, लक्ष्मीच्या पाठींत सासूचे दोन सपाटे बसत. कलंकाईचा हात निवून घेण्याचा तो एक शिरस्ता होता. पण ' सरकारचा कायदा अन् सासूचा मार ' ह्या गोष्टी कुणाला चुकतात? ह्या विचारसरणीनें लक्ष्मी सारें कांहीं सहन करी. नंतर दुधदुभत्याची व्यवस्था. पाणी भरणं. स्वयंपाकापुरतं पाणी ती सकाळींच भरून ठेवी. पण हौद वगैरे भरण्याचं काम तिला सकाळचे दहा साडेदहा वाजेपर्यंत पुरे. तेवढ्यांत सासुबाईदेखील न्याहारी उरकत. त्यांचं ताट उचलणं अन् नदीवर धुणं धुवायला जाणं हीं कामं तयारच असत. इतकं करीपर्यंत बाराचा सुमार होई. धुवून आली कीं दुपारचा सयपाक. दोनाच्या सुमारास तिच्याखेरीज सर्वांचीं जेवणं होत. त्यांचीं भांडीं घासल्यानंतर चाराचे सुमारास कुठें तरी कोपऱ्यांत, रात्रींच्या भाकरीचे तुकडे अन् इतरांच्या ताटांतील शिलकी पदार्थ घेऊन, लक्ष्मी जेवायला बसे. जी स्थिति दिवसाची तीच रात्रीची. रात्रींच्या तिच्या जेवणास अकराबारा वाजत. तिला विश्रांति अशी कधीं मिळेचना! नवऱ्याजवळ कशाबद्दलहि ब्र

काढण्याची सोय नव्हती लक्ष्मीला. कितीही झालं तरी तो कलंकाईचा मुलगा होता, अन् कलंकाई त्याची आई होती.

नारायण हा कलंकाईचा नवसाचा मुलगा, पुढेंमागें भावंडें नव्हतीं त्याला. घरीं दोन बैलांची शेती. वडील म्हातारे झालेले. म्हातारपणानेंच त्यांचे डोळे गेले होते. घरांत कलंकाई करील ती पूर्व. लक्ष्मी ही नारायणाची दुसरी बायको.

मुलगी एवढी कष्टाची म्हणूनच कलंकाईसारख्या लंकाढाय सासूशीं गांठ आहे हें माहीत असूनमुद्धां, संभू तिवाऱ्यानीं हा शरीरसंबंध घडवून आणला. घराण्याला खोट नाहीं, खाऊनपिऊन सुखी, मुलगा होतकरू, असं असतांना; केवळ सासूच्याच पराक्रमाला भिऊन जाण्याइतकें भयंकर त्यांना त्यांत कांहीं दिसेना. तरी 'पहिल्या सुनेच्या मृत्यूला कारणीभूत सासूच' असा कुणीतरी एक बोलून गेला होता संभू तिवाऱ्यांजवळ. पण 'दुस्मान सर्व्यांईलेच असतात. पाह्यत नसील त्याले कोनाचं बरं; अन् व्हनून आला सांगत !–' असा पोक्त विचार करून तिवाऱ्यांनीं उडी घेतली.

एकदांचा झालों मी काळजींतून मुक्त, उतरला देवानं भार डोक्यावरचा, असें वाटलें त्यांना लक्ष्मीच्या लग्नानंतर. लक्ष्मीच्या कष्टाळू स्वभावाची संभू तिवाऱ्यांना इतकी खात्री होती कीं, 'आपलाच दाम खरा असल्यावर सासू काय करील ?' असा त्यानीं दोघां चौघांना सवाल टाकून गप्प केलं.

वडिलांना इतका आत्मविश्वास वाटावा अशीच वागणूक होती लक्ष्मीची. 'कष्ट करून मरील पन कामाबद्दल मार नाहीं खानार बावा मी कोनाचा !' हेंच तिनें माहेर सोडतांना संभू तिवाऱ्यांना दिलेलें उत्तर. ओल्या डोळ्यांनींच त्यांनीं पोटच्या गोळ्यास निरोप दिला. 'लक्षीमी कमीजास्त झालं त तुहं तोंड नाहीं पाह्यनार बर मी...!' वाक्य उच्चारलं, पण पुढें ! त्यांच्या डोळ्यांतील अश्रुप्रवाहास तेवढ्याच वाक्याचा बांध होता असें वाटें. तो बांध फुटला. धरण फुटलें कीं कोंडलेलें पाणी कसें दाही दिशेला धांवतें, अन् काय असतो वेग त्याचा ? अगदा तसेंच झालें संभूजीचें. दुपट्टयाचा पदरचा पदर भिजला पण त्यांच्या डोळ्यांची धार खंडली नाहीं घरीं येईपर्यंत.

कलंकाईला लक्ष्मीच्या कष्टाचं कांहींच वाटेना. 'करते हून काय झालं ? पोराची बायको करून घेतलं तिले ! फुकट नाई !' हीच कलंकाईची विचारसरणी. लक्ष्मीचें तर विचारायलाच नको. माहेरचं माणूस देखलं कीं, तिच्यानें राहवेना, तिला भडभडून येई. पण त्याच्याजवळ देखील कांहीं सांगण्याची चोरी. 'चुगली केली' असं वाटायचं सासूला. शिवाय "बावाले काय वाटील !" पोटचा गोळा दुःखाच्या खाईत आहे असें त्यांना कळलें कीं, त्यांना किती दुःख होईल.

लक्ष्मीला, सारं गुपचुप सहन करण्याखेरीज मार्गच दिसेना दुसरा.

× × ×

दिवाळीला फारच जिकीरीनें लक्ष्मीला पाठवलं होतं माहेरीं कलंकाईनें. तरी तीन वेळां दमणी परत पाठविली होती तिनें न्यायला आलेली. पण मुलीचा अर्धा हाल कायम न राहिल्याचें तिवान्यांना कळलें होतें लोकांकडून. म्हणूनच हट्टाला पेटले होते ते सुद्धां. त्यांनीं चवथ्यांदा स्वतःच दमणी नेली. मग मात्र कलंकाईची मति कुंठली. लक्ष्मीला पाठविल्याशिवाय गत्यंतरच नव्हतें आतां. सायंकाळच्या जेवणाचें वेळीं लक्ष्मी वाढत होती. अन् तिच्या घरीं तिवाने जेवीत होते. पण हीच माझी लक्ष्मी असें संभूजींना एकदम म्हणवेना. भकास चेहरा अन् वाळल्यानें रामकाठीसारखी उंचच उंच झालेली तिची देहयष्टी. संभूजींच्या गळ्याखालीं घास उतरेना. 'तूं घातकी आहेस' त्यांचं मन त्यांना म्हणालं.

× × × ×

'सासूच्या घरीं धाडण्या पक्षी मले ईख द्या बावाजी... !' रडतच लक्ष्मी बोलत होती.

या तिच्या वाक्यानें तिच्या सासरचें चित्र, संभूजीच्या डोळ्यांसमोर स्पष्ट दिसूं लागलें. रात्रीं आठाची वेळ. स्वतःच्या घराच्या चौकांत संभूजी तिवाने जेवीत होते. समोरच कंदील होता. लक्ष्मी चुलीजवळ होती. तिची आई वाढत होती. सकाळींच लक्ष्मीच्या सासरहून गडी येऊन गेला होता. 'लक्ष्मीले पाठवा ! घरी कामाले कोनी नाई ! म्हातारीची फार घान होते !' येवढाच निरोप आणला होता त्यानें.

देगांवचा सखारामम्हाली भेटला होता काल संभूजींना.

‘ तिवाने बुवा ! घर पाह्यलं पन् सासू नाहीं पाह्यली तुम्ही लक्ष्मीमीची. लेकीबाई सर्व्याईलेच असतात पन् कलंकाईच सारंच न्यार हाये लेक ! ’ सखारामम्हाल्याचें बोलणें तिवान्यांनीं ऐकून घेतलें अन् विषय टाळण्याच्या दृष्टीनें चंची पुढें केली. जवळजवळ दहा मिनिटें होते एकत्र ते दोघे. पण पिकापाण्याच्याच गोष्टी केल्या नंतर त्यांनीं.

‘ याले का बाप म्हनतात ! अरे सोयऱ्या सोयऱ्यांत वाद नसाव, गोठ खरी ! पन पोरगी जिंवसी चालली ना !...!’ मारुतीचे पारावर संभूजी तिवान्यांना उद्देशून म्हातारे नथूबुवा कळकळीनें बोलत होते.

संभूजी तिवान्यानें शामराव पाटलाला देगांवला मध्यस्तीसाठीं पाठविलें. “ सोयऱ्या सोयऱ्यांत वाद नसाव ! पोरगी लाहान हाये ! चुकली सवरली त निभावून घ्या !...!” वगैरे सांगून कलंकाईचें मन वळविण्याचा त्यांनीं प्रयत्न केला.

‘ नाकावर टिच्चून दुसरी सून आनतो पंधरा दिवसांत घरी. मंग घिवून बस म्हना त्याले पोरीले जलमभर ! ’ कलंकाई कडकडली.

शामराव पाटलास मेल्याहून मेल्यासारखें झालें.

पोटचा गोळाच तो ! तिवान्यांनीं नशीबावर हवाला ठेवला. मनाचा निर्धार केला अन् घेतली मुलीला ठेवून घरीं. सासू जिवंत असेपर्यंत मुलीला सासरची वाट धरायला नको असें संभूजींनीं ठरविल्याचें समजतांच लक्ष्मीला खूप आनंद झाला.

× × ×

‘ पोरीच्या संसाराची माती केली लेकानं ! त्या बहाद्दरानं त तिसरं लगन केलं ! आता बस म्हना पोरीले घीऊन जलमभर !—’

मढीवर गप्पा चालल्या होत्या. एक मध्यम वयाचा मनुष्य बोलत होता. बाकीचे ऐकत होते. मधूनच कुणी कांहीं सुचवी अन् गप्पांचा ओघ अखंड राखला जाई. साऱ्या गांवगप्पांची उजळणी ह्याच एकमेव ठिकाणीं व्हायची

रोज. आज 'तिवाने पुराण' सुरू होतें. गांवकऱ्यांना तो विषय मिळाला होता.

गांवांत गांवगप्पांचें पेंव फुटलें होतें. त्याची दुर्गंधी लक्ष्मीपर्यंत पोहोंचली. धाब्यावर ती एकटीच बसली होती सायंकाळचे सुमारास. फार विचारांत दिसे ती आज.

'पोरी ! काहून बसली व एकटीच ?' राधाईच्या येण्याची दादही नव्हती लक्ष्मीला. त्यांनीं तिच्या खांद्याला हालवूनच उच्चारले वरील शब्द.

राधाबाईला बघतांच लक्ष्मीनें त्यांच्या गळ्याला मिठीच मारली. ' यापक्षी सासूचा मार खात खात मेली असती मी, त बरं झालं असतं ! ' असं म्हणून पोटभर रडली लक्ष्मी, आईच्या गळ्यांतगळां घालून !



# दैवाचा फेरा

आकोल्याचा प्रखर उन्हाळा म्हणजे देहाची लाही लाही करणारा निसर्गाचा भव्य भटारखाना. वैशाखांतील भर दोन प्रहरीं घराबाहेर पडून एखादें महत्त्वाचें काम आटोपून यायचें असलें तरी जीव नको नको म्हणायचा. बर्फ आणि गारपाणी हाच ह्या हंगामांतील नामजप. टांग्यांचे घोडे आणि श्रमजीवी माणसें यांच्या डोळयांना काळयानिळया रंगांच्या काचांच्या झापडी दिसायच्या ! सर्वत्र हुश्र्...हुश्र्. ...!

पण अशा ह्या जळजळत्या भट्टींत, फूटपाथचे कडेला पडलेला, विमनस्क स्थितींत गडबडा लोळून होरपळून निवणारा; एक हताश प्राणी, येणाऱ्या-जाणाऱ्यांचें चित्त क्षणभर स्वतःकडे आकर्षीत होता. त्या अभागी जीवाची दुर्दशा, त्या एका जीवाशिवाय इतरांस कशी जाणवणार ? त्याचे डोकीवरील केसांत धूळ, धूर, माती, केर, कागदाचे व कापडाचे बारके—बारके कपटे व घाम ह्यांचें मिश्रण इतकें एकजिनसी झालं होतें कीं, ह्या सगळया वस्तु पिंजून काढूनहि निघतील कीं नाहीं याची वानवाच वाटे. चेहरा पाहून जन्मतारीख सांगणारा ज्योतिर्विद विरळा; पण याचा चेहरा पाहून मृत्युतारीख सांगण्यास ज्योतिषाचीच आवश्यकता होती असें मुळींच नाहीं. त्याचें सगळें अंग काळें—ठिक्कर पडलेलें होतें आणि त्यावरून घामाचे गढूळ ओघळ सारखे निथळत होते. भीषण उन्हामुळें होणारी देहाची तल्खली निवारण्यास त्या जिवास कुठलें साधन ? तव्यावर भाकरी भाजावी त्याप्रमाणें, पाठीचे चटके असह्य झाले कीं पोटाची ढाल पुढें करून तीवर ते चटके झेलायचे; अशी सारखी अरतपरत चालली होती त्याच्या श्रांत देहयष्टीची. खालून संतप्त भूमीचें रखरखीत आंथरुण; आणि वरून छाया ? कुठली ? देहापुरत्याच आकाराचा वरूनहि आकाशाचा साडेतीन हातीं तुकडा ! क्षीण, आर्त, दीन, क्लांत अशा खोल गंभीर आवाजांत 'हूँऽ, हूँऽऽ' ही जीवनाची एकच आरती

त्याच्या मुखांतून निघत होती. प्रखर उन्हाचे ज्वलंत चटके जसजसे अधिकाधिक बसत, तसतशी 'हूँ ऽ हूँ ऽ' ही आरती अधिकाधिक आर्तस्वरांत उद्‌गारली जाई.

सगळे पांथस्थ या अभागी जीवाच्या करूण दशेकडे एक दृष्टिक्षेप टाकून पुढें जात. सर्वांनाच एकापेक्षां एक महत्त्वाचीं कामें होतीं. तिथें कुणाच्या गाण्याचा जलसा किंवा पत्त्याचा, बुद्धिबळाचा अगर कॅरमूचा डाव थोडाच होता, म्हणून तरी लोक आपआपलीं महत्त्वाचीं कामें टाकून क्षणभर थांबतील! असें कितीतरी तत्त्वज्ञानी महाभाग त्या रस्त्यानें निघून गेले कीं ज्यांनीं 'सबको एक दिन जानाहि है' या एकाच वेदांतीं निर्णयानें त्या करुणजीवाची स्मृति आपल्या मन:फलकावरून साफ पुसून टाकली! कित्येक न्यायनिष्ठुर न्यायाधीश, 'जैसी करणी, तैसी भरणी' ह्या न्यायाचा उल्लेख करून तेथून निघून गेले! कित्येक सडेतोड स्पष्टवक्ते, तर 'मरने दो पागल को' ह्या वाक्याचा बेपर्वाईनें उच्चार करून, त्या करुण जीवाजवळून पसार झाले! 'ह्याच्या, इथें पडण्यानें सभोंवारची सर्व हवा दूषीत होणार बुवा अगदीं,' असें कांहीं आरोग्यवादी स्पष्टच बोलून गेले! कित्येक स्वच्छतावादी सज्जन, ह्या जीवाजवळून जातांना नाकास हातरुमाल लावून गेले; तर कित्येक महाजन, बाजूनें तोंड वळवून झपाझप पावलें उचलीत तेथून चालते झाले! कित्येक नाजूक प्रकृतीच्या स्त्रीपुरुषांनीं त्या देखाव्याकडे पाहतांच किळस आणून, आपली थुंकी त्या फूटपाथवर थुंकून टाकली! ह्या सगळ्या समाचारांस, शिष्टाचारांस, संभावनांस, आरोपांस, तत्वज्ञानांस, नीतिशास्त्रांस, अचल नेत्रांनीं, क्षीण-दृष्टीनें पाहून 'हुंऽ हुंऽ' हें एकच उत्तर त्या अभागी जीवाकडून दिलें जात होतें.

सुमारें चार वाजण्याचे वेळेला, सूर्याच्या अधोगतीस प्रारंभ होतांच, नगरांतील प्रतिष्ठित लोक त्या राजरस्त्यानें अधिकाधिक जाऊं-येऊं लागले. फूटपाथवर विव्हळत पडलेल्या त्या दीनजीवाकडे बहुतेकजणांनीं एकवार दृष्टिक्षेप टाकला. पण कुणालाच ह्या अभाग्यासाठीं कांहीं करतां येणें शक्य वाटलें नसावें. त्याच्याजवळून रिकाम्या मनानें चालत गेलेल्या डॉक्टरास त्याच्यासाठीं कांहींच करवां येत नव्हतें, त्याच्याकडे पाहून त्याच्या जवळून गेलेल्या वकी-

लास त्याच्यासाठीं कांहींच करतां येण्यासारखें नव्हतें ! त्याच्या क्लांत कायेवर आपल्या मोटारीची धूळ उडविणाऱ्या लक्ष्मीपुत्रास त्याच्याकरितां कांहींच करतां येणें शक्य नव्हतें ! त्याच्या शेजारून जाणाऱ्या दे. भ. राष्ट्रवीरास त्याच्यासाठीं कांहींच करतां येत नव्हतें ! त्याच्याकडे टकटका पहात जाणाऱ्या ह. भ. प. बुवा महाराजांस त्याच्यासाठीं कांहीं करतां येणें शक्य आहे असें वाटेना ! कुणाच्याहि जवळ अशीं कांहीं साधनें नव्हतीं कीं, ज्यांचा उपयोग त्या अभागी जीवास होईल. त्या अभागी जीवाची तशी अपेक्षाही नव्हती. क्षीणदृष्टीनें सर्वांकडे पहायचें व हूं ऽ हूं ऽ हूंऽ ! हें जीवनसंगीत विव्हळा-यचें येवढेंच त्याचें काम.

त्याच्या जवळून जाणाऱ्या एका प्रतिष्ठित डॉक्टरास एका सद्गृहस्थानें विचारलें, " काय डॉक्टरसाहेब पाहिलीत का ही स्थिति ? आपल्या ओळखीचे आहेत ना हे गृहस्थ ? यांनींच तर तुम्हाला विलायतेला जाण्याकरितां अगदीं एका शब्दानें दोन हजार रुपये देणगीदाखल दिले होते. तेच हे गृहस्थ हरिश्चंद्रराव सुखात्मे ! यांची ही अवस्था कशी झाली नकळे. पण हे गृहस्थ तेच हें मात्र नक्की. "

एक दीर्घ निश्वास टाकीत डॉ. लोभे विस्मयानें उद्गारले,-" असें काय? अरेरे ! कुणावर कसा प्रसंग येईल तें कांहीं सांगतां येत नाहीं बुवा ! दिवस मोठे कठीण आले आहेत ! बरें, आपण ह्यांच्या ह्या परिस्थितींत हातभार लावावा तर तेंही काम, फार कठीणच ! चार मुलाबाळांचा संसार आणि त्यांत पुन्हां आजकालच्या शिष्टाचाराला धरूनच राहायला पाहिजे ! नाहींतर फजीतीच ! सध्यां आमचें नवीन घर बांधण्याचें काम चालू आहे. त्यासाठीं खर्च करतां करतां जीव कसा मेटाकुटीस आला आहे पहा. त्यांत पुन्हां आतां तिसऱ्या मजल्याचें व साईडगॅलरीचें एस्टिमेट आमच्या उराशीं येऊन थडकलें आहे. कुठें कांहीं एका पैची सवड निघेल तर शपथ. इकडे स्टेशनवर दोनतीन हजार रुपयांचें नुसतें शो हॉलचें फार्निचर येऊन पडलें आहे. आपलेंच आपणाला बघवत नाहीं अशी स्थिति झाली आहे प्रत्येकाची. यांतून ईश्वर कसा काय तारील तें खरें." हें बोलत असतांनाच डॉक्टरांनीं तेथून पाय पुढें घेतला व त्या गृहस्थानें 'बरें !' म्हणून त्यांना नमस्कार केला.

तेथून घाईघाईनें निघून गेलेले एक वकील एका गृहस्थाजवळ उभे राहून बोलत होते. " काळाचा काय चमत्कार आहे पहा ! या फूटपाथवर पडलेल्या गृहस्थाची ओळख नसेल तुम्हाला कदाचित् ? मी चांगलें ओळखतों त्यांना. शंकरपूरचे हे हरिश्चंद्रराव सुखात्मे. लक्षाधीश गृहस्थ ! आणि सज्जनपणा तर अगदीं अनन्यच! सुसंस्कृत आणि बहुश्रुत. आठ–नऊ वर्षांपूर्वीची गोष्ट आहे पहा. एकदां एका निरपराधी पण अनोळखीच्या गृहस्थास पांच हजार रुपयांचा जामीन कोर्टानें मागितला असतां, अगदीं त्याच क्षणास यांनीं तो जामीन भरला व आरोपीस मोकळें केलें. त्या केसमध्यें तो गृहस्थ पुढें निर्दोषी ठरला; व त्या केसची फी म्हणून रोख चारशें रुपये यांनींच मला दिले होते. शिवाय स्वतः माझ्यावरील देखील एका प्रसंगांत यांनीं तनमनधनें जी मदत केली होती तीमुळेंच मी आज जिवंत दिसतो आहे तुम्हाला. पण आज त्यांची स्थिति पहा किती चमत्कारीक झाली आहे ! बरें, अशा वेळीं आपण कांहीं यांच्याकरितां करावें तर तेवढा वेळ पाहिजे; शिवाय ही कोळशाची दलाली करीत असतांना पोटाची चिंता मिटलेली असावयास पाहिजे. इथें तर, ' निघरे दिवसा अन् भररे पोटा' हाच व्यवसाय सारखा पाठीमागें लागलेला. कांहींहि करून सायंकाळीं पांच–दहा रुपये खिशांत खुळखुळले म्हणजे सगळी दयामाया नि पुण्यकर्में पडलीं म्हणायचीं पदरांत. अशा कोंडींतून आतां आपल्या सारख्यांनीं करायचें तरी काय ? ' ईश्वर बिचाऱ्यावरील प्रसंग निभावून नेवो!' असें म्हणून आपलें कार्य पार पाडण्याशिवाय मार्गच नाहीं दुसरा. "

श्री. झोले वकील आपली सनातनसहानुभूति प्रदर्शित करीत असतांनाच, तेथून भर्रदिशी निघून गेलेल्या मोटारकडे बोट दाखवून, एक विशिष्ट पोशाक केलेला तरुणप्रेक्षक बोलूं लागला, " आणि हें पहाना ! आतां मोटारमधून गेलेले रावसाहेब. यांच्या रक्ताचा कणन्कण आणि मांसाचा पिंडन्पिंड या सुखात्म्याच्या अन्नानें तयार झालेला आहे. यांना नोकरी लावून दिली सुखात्म्यांनीं ! यांच्या लग्नाकरितां पाण्यासारखा पैसा खर्च केला सुखात्म्यांनीं आणि एवढेंच नव्हे तर, आतां ही भर्रदिशी निघून गेलेली मोटारही सुखात्म्यांनींच आपल्या पैशांनीं घेऊन दिलेली. आणि हें एवढें कशाकरितां ! तर सुखात्म्यांनीं,

या रावसाहेबांच्या वृद्ध-आईच्या मृत्यूच्या वेळीं शब्द दिला होता कीं, "तुम्ही सुखानें प्राण सोडा ! मी बापूला कधींच कमी पडूं देणार नाहीं !"

हें बोलत असतांना त्या तरुण गृहस्थाचे डोळ्यांतून अश्रू डबडबून आले. पुढें त्याच्यानें बोलवेना. त्या तरुण गृहस्थाची ही कहाणी ऐकून घेतल्यानंतर झोले वकील म्हणाले,—"अहो, तें मला सगळें ठाऊक आहे. एकदां मी अनाहूतपणें याच गृहस्थाकडे एका सभेच्या वर्गणीकरितां गेलों असतांना स्व-खुषीने त्यांनीं कबूल केलें होतें कीं,—" वकीलसाहेब सभेसाठीं जी कांहीं पांच-दहा हजार मंडळी जमा होईल त्यांच्या जेवणाचा सगळा खर्च मी एकटा देईन, तुम्ही कांहीं चिंता करूं नका." आणि खरोखरच, ह्या सुखात्म्यांनीं त्या सभेचा एवढा मोठा जेवणखर्च अगदीं आनंदानें झेलला.

हरिश्चंद्रराव सुखात्म्यांचें मुक्तकंठानें गुणगान करीत त्या दोन व्यक्ती पुढें पुढें चालत असतां, वाटेंत शंकरपूरच्या प्रसिद्ध अशा राममंदिराचा पुजारी, हरिश्चंद्ररावांची चौकशी करीत येत असलेला त्यांनीं पाहिला. हा पुजारी उत्तर–हिंदुस्थानाकडील मूळचा रहिवाशी असावा असें त्याच्या भाषेवरून वाटत होतें. पुजारी गृहस्थ लोकांना विचारीत होता,—" भाई, इधर रास्तेमें कोई खुले सिर और फटेटूटे कपडोंमें लपेटा हुवा इन्सान आपने देखा ?"

इकडून जाणाऱ्या एकदोन गृहस्थांनीं त्याला दिलेल्या माहितीवरून, तो हरिश्चंद्रराव सुखात्म्याजवळ येऊन पोहोंचला. हरिश्चंद्ररावांची दयनीय स्थिति पाहून त्याला भडभडून आलें. हरिश्चंद्ररावांजवळ जाऊन पुजारी गृहस्थ म्हणाला, " पटेलसाब आप मुझे पहचानते हो ? मैं श्रीरामजी के मंदरका पुजारी हूँ ! मेरा नाम बद्रीनाथ। आप ऐसी दशामें यहाँ कैसे पडे ? क्या आप मेरे साथ चलेंगे ? श्रीरामजी के मंदरमें कुछ दिन आराम कर, तबियत सुधारलो और बाद स्विकृत कार्य में चले रहो ! "

हरिश्चंद्ररावांनीं क्षीण दृष्टीनें किलकिले डोळे करून एकदां बद्रिनाथाकडे पाहिलें व पुन्हां आपला 'हूँऽ ! हूँऽ !' हा जीवनसंगीताचा चरण आळ-विण्यास सुरुवात केली. भोंवतीं गोळा झालेले लोक बद्रिनाथास विचारूं लागले कीं,

'यांची तुमची ओळख कशी ?' पुजारीगृहस्थ त्या सर्वांकडे वळून सांगू लागला, "अरे भाई, यह तो बडा सरदार आदमी है। लाखों रुपयोंकी इनकी जायदाद है। पटेल साहबनें हमारे राममंदरको पांच हजार रुपये अपने हाथसे दान दिये है। और भी कितनोंके उजडे हुये घर बसाये। कितनों को वख्तपर इमदाद दी। और न मालुम कितने गरिबोंको हाथ दिया। आज उसी राजाकी यह दशा हो गयी है। ईश्वरकी माया कुछ समझमें नहीं आती।"

बद्रिनाथाच्या भोंवतीं कांहीं वेळपर्यंत जमलेले लोक थोड्याच वेळांत आपापल्या रस्त्यानें निघून गेले. बद्रिनाथ तेथेंच हरिश्चंद्ररावांजवळ बराच वेळ-पर्यंत बसला, व सायंकाळच्या सुमारास एका टांग्यांत बसून निघून गेला.

दिवे लागण्याचे वेळीं एक टॅक्सी मोटार येऊन हरिश्चंद्ररावाजवळ एकदम थांबली. मोटारींतून एक तरुण गृहस्थ उतरला. ह्या तरुण गृहस्थाबरोबरच दुसरा एक मध्यमवयाचा गृहस्थ मोटारींत बसला होता. तोहि मोटारींतून उत-रून तरुणाच्या मागोमाग हरिश्चंद्ररावाजवळ आला. ह्या मध्यमवयाच्या गृहस्थाच्या अंगांत एक मळकट आणि फाटलेला असा सदरा व त्यावर जाडेभरडें उपरणें होतें. नेसू धोतर गुढग्याच्यावर असून कमरेस काच्या बांधलेला होता, आणि पायांत सतरा ठिगळांचीं पायतणें त्यानें घातलीं होतीं. डोक्यास एक लक्तरें लोंबणारें मुंढासें होतें. त्याच्या चर्येवरून तो साक्षर होता असेंहि वाटेना. तो एकदम त्या विव्हळणाऱ्या जीवाजवळ धांवतच गेला व म्हणाला.

" पाटील बुवा, मी तुमचा झिंगू ! तुमाले नियाले आलों मी. चाला माह्या संगऽ. तुमच्यासाठीं च म्या मोटर आनली. हिंम्मत नोका सोडू. देव करील त अवघ दुखनं हटून जाईल. सर्व्याईचा मायबाप हाये थो. त्याच्यावर भरोसा ठुवा. तुमीच मले हे दिवस दाखोले अन् तुमची हे दशा ? मी तुमाले अल्लद उचलून मोटरींत ठुतो. चार रोज माह्या घरीं राहा; बरे व्हा अन् मंग पुढची पुढं. "

असें म्हणून क्षणाचाही विलंब न लावतां झिंगूनें तो गलितगात्र देह आपल्या पाठीवर घेऊन सोबतच्या तरुणाच्या सहाय्यानें त्या मोटारींतील गादी घातलेल्या सीटवर हळूंच ठेवला. झिंगू त्या क्षीण देहास आधार देऊन

बसला व सोबतच्या तरुणानें मोटार चालू केली. तमासगीरांना एक चर्चेचा विषय झाला. नाना तर्ककुतर्क सुरू झाले. कुणी म्हणाले,—"त्या बिचाऱ्याचा मुलगा असेल नाहींतर तो!" कुणी म्हणाले,—"एखाद्या दीन सहाय्यक मंडळाची मोटार असेल ती!" आणि कुणी म्हणाले,—"एखाद्या फ्री हॉस्पिटलनें ती व्यवस्था केली असेल!"

× × ×

सात—आठ दिवसानंतरची गोष्ट! एका मोठ्या बादशाही बंगल्यांत सर्व सुखसोयींनीं सुसज्ज अशा हॉलमध्यें हरिश्चंद्रराव सुखात्मे एका प्रशस्त कॉटवर पडले होते. सकाळींच डॉ. लोभे त्यांना तपासून व आश्वासन देऊन गेले होते कीं,—"कांहीं घाबरण्याचें कारण नाहीं बरं कां हरिश्चंद्रराव! तुमच्याकरितां सगळा दवाखाना खर्च करून टाकीन! विलायतपर्यंत चक्कर मारून असतील नसतील तीं सर्व साधनें तुमच्या जीवासाठीं मिळवून देईन व तुमची जीवापाड सेवा करीन. तुमच्यासारख्या महानथोर विभूतीसाठीं आम्हीं खपूं नये तर मग आमच्या डॉक्टरीला काय आग लावायची आहे!

हरिश्चंद्ररावांनीं ओठ न हलवितां 'हूँ' एवढाच उद्‌गार, दुसरीकडेच बघून काढला.

कोर्टांत जातांजातां श्री. झोले वकील, हरिश्चंद्ररावाकडे एक चक्कर मारण्यास विसरले नाहींत, व तेही जातांना हरिश्चंद्ररावांना आश्वासून गेले कीं,—"मला अजूनही तुमच्या मुकदम्याकरितां शिकस्तीचा प्रयत्न एकदां करून पहावा असें वाटतें हरिश्चंद्रराव! तुमच्याकरितां खपलों तरच या वकीलीचा कांहीं उपयोग. आमचा कांहींतरी उपयोग होऊं द्या तुम्हाला."

'हुँ!' सुखात्मे उद्‌गारले.

दे. भ. सुगंधीलाल, सायंकाळीं हरिश्चंद्ररावांना भेटण्याकरितां आले तेव्हां त्यांना सुचविण्यास विसरले नाहींत कीं, "कांहीं अडचण पडेल तर मला सांगा, शक्य ती सेवा करूं."

'हुँ!' सुखात्मे उद्‌गारले.

आरती सपण्याचें वेळीं राममंदिराचे पुजारी बद्रिनाथ, हरिश्चंद्ररावांकडे येऊन सांगून गेले कीं, "आपके लिये मैंने रामनामका जप एक लाखबार करनेका निश्चय किया है! परमेश्वर आपका भला करेगा!"

'हुँ!' हरिश्चंद्रराव उद्गारले.

हरिश्चंद्रराव सुखात्मे ह्या बंगल्यांत असतांना कितीतरी बडी बडी अन् निरनिराळ्या धंद्यांची मंडळी त्यांना भेटण्याकरितां रोज येत होती. अन् हरिश्चंद्रराव 'हुँ' ह्या एकाच अक्षरी शब्दानें सर्वांचे स्वागत करीत होते.

'विश्वंभर' नामक वर्तमानपत्रांत त्याच आठवडयांत खालील मजकूर संपादकीय लेखांतून प्रसिद्ध झाला:—

## "फूटपाथवरील हरिश्चंद्र!"

"शंकरपूर येथील एक उदार सद्गृहस्थ श्री. हरिश्चंद्रराव सुखात्मे यांची प्रकृति सध्यां सुधारलेली असून ते लवकरच खडखडीत बरे होतील असें डॉक्टरांचें मत आहे. हरिश्चंद्ररावांची प्रकृति आकस्मिक मानसिक धक्क्यामुळें कांहीं दिवसांपूर्वी बिघडली होती व त्या दुरवस्थेंतच त्यांचे कांहीं दिवस गेले. अहेतुक बुद्धीनें व निर्भेळ प्रामाणिकपणानें परोपकार करणाऱ्या महान् धन्य विभूतींना ईश्वर नेहमींच कसोटीला लावतो! तीच स्थिति हरिश्चंद्ररावांची झाली! ह्या दुर्घटनेंतून एक नितांत आश्चर्यकारक अशी अद्भुत घटना निर्माण झाली; ती ही कीं, झिंगू नांवाच्या एका मजूर गृहस्थानें हरिश्चंद्ररावांना आपल्या अनुपम औदार्याचा चमत्कार दाखविला. हरिश्चंद्ररावांनीं ह्या झिंगूस कांहीं अडचणीचें वेळीं पांच रुपये दान दिले होते. लोभविवश, झिंगूनें ते पांच रुपये, चुकून एका लॉटरींत घातले. योगायोगानें झिंगूला पंचेचाळीसहजार रुपयांचें बक्षीस मिळालें. तें बक्षीस हरिश्चंद्ररावांच्या देणगीच्या पैशांमुळें आपणांस मिळालें म्हणून त्यांवर आपला मुळींच हक्क नसून, ती सर्व रक्कम हरिश्चंद्ररावांना यापुढे सौख्य लाभावें म्हणून झिंगूनें तदर्थ

खर्चीं घातली. या घटनेनें हरिश्चंद्रराव सध्यां पूर्ववत् सर्व व्यवहार चालविण्यास समर्थ झाले असून ह्या योगायोगाबद्दल, व त्यापेक्षांही आश्चर्यकारक अशा झिंगूच्या औदार्याबद्दल सर्व लोक विस्मित झाले आहेत.

वरील मजकूर सत्य असून श्री. हरिश्चंद्ररावांच्या खास निवेदनावरून, आम्हीं तो प्रसिद्ध करीत आहोंत. झिंगुसारखे कृतज्ञ सज्जनच भारतास ललामभूत होतात."



# सीमोल्लंघन : : : : :

दसऱ्याचा दिवस. सायंकाळीं पांचाचा सुमार. रंगीबेरंगी पोशाखांत बोपुरीकर बोपुरीच्या राजरस्त्यावर जमले होते. छकड्यामागून छकडा सुटत होता. खोलवाट दणाणून गेली होती आज. लोक धरून लगबगीनें निघत. मुलांची टोपी, तरुणांचा पटका अन् वयस्करांची पगडी हीं वतनाचीं शिरस्त्राणें होतीं जगूं. भडक् रंग अन् जराची.जोड हें त्यांचें वैशिष्ट्य. वर खोवलेलें धान, तुऱ्यासारखं शोभून दिसे. भेटेल त्याला मिठी मारून आपुलकी व्यक्त करीत समवयस्क. पण वयोवृद्धांची गांठ पडली कीं; त्यांचें पाय धरण्याचा मान मिळे लहानांना. सारे तल्लीन झाले होते आपल्या ह्या उद्योगांत. त्यांना येवढेंच काम वाटे आजचें.

छकड्यांची येजा चालू होती. परत आलेला छकडा, जाणाऱ्यापेक्षां निराळा दिसे. घाई, उत्कंठा, धांदल इत्यादि छकड्यांतील मंडळींची जातानाची वैशिष्ट्यें, पार नाहींशीं झालेलीं असत परत आल्यानंतर. जातांना मोकळ्या हातांनीं जात. येतांना आभाटा अन् शमीच्या डाहाळ्या आणि त्याबरोबरच एकेक कडब्याची खोपडी प्रत्येकाच्या हातीं दिसे. कांहीं तरी मिळविल्याचें समाधान त्यांच्या चेहऱ्यावर आढळे. सोन्या-रुप्याचे हे कमाईदार, कर्णाच्या औदार्यानें वाटत सुटत नंतर तेंच. सालाबादचा शिरस्ताच असा कीं, परत येणाऱ्या लोकांनीं सोन्यारुप्यासह प्रथम सरळ घरीं जायचें, देव्हाऱ्याजवळ जाऊन देवासमोर आपली कमाई रुजू करायची आणि नंतर इतरांच्या भेटीगांठी घ्यायच्या. पण यंदाचें सारें निराळेंच होतें. परत येणारा प्रत्येकजण आपल्या सरंजामासह छकड्याखालीं उतरे, पण सरळ घराची वाट न धरतां, आज सर्व छकड्यांचें स्टेशन झालेल्या गांवाबाहेरील अंधाऱ्यावडाजवळच रेंघळत असे.

गांवच्या तीसपस्तीस पिढ्यां पाहिलेल्या त्या अंधाऱ्यावडानें. अफाट होता त्याचा विस्तार. त्याची गडद छाया अंधःकारमय भासली असावी लोकांना.

म्हणूनच त्यांनीं ‘ अंधाऱ्या ’ असें विशेषण दिले होतें त्याला. अंधाऱ्या वडाखालीं मोठमोठें तढव आंथरलेले होते आज. यंदाचें हें नाविन्य लोकांच्या कुतुहलाचा विषय झालेला दिसे. अनपेक्षित अन् अपूर्व असें कांहीं येथे घडणार आहे आणि हें पहाण्यासाठीं आम्ही थांबलो आहोंत असें त्यांचे चेहरे सांगत.

‘ हरहर महादेव ! ’ सारा जनसमुदाय एका आवाजांत उद्गारला.

‘ हान गना ! ’ लक्ष्मण पाटलांनीं धूरीवर असलेल्या गणा महारास इशारा दिला. लक्ष्मण पाटलांच्या इशाऱ्यासरशीं गणा महारानें बैलांचे दोर झटकले. छकडा सुटला. टिक्या-चंद्र्याची जोडी ती ! वीस कोसांत नाणावलेली ! कितीतरी पट जिंकले होते त्या जोडीनें ! पाहतां पाहतां डोळयांआड झाला छकडा. सर्वांचे डोळे त्या एकाच छकड्याकडे लागलेले होते.

सारेच चकित झाल्यासारखे दिसत. डोळ्याचें पारणें फिटल्याचें समाधान कांहींच्या चेहऱ्यावर दिसें. कांहींचीं तर गात्रेंच गलित झालेलीं दिसत त्यांच्या हालचालीवरून. कांही तेथेंच बसले. जडपावलांनीं परतलेदेखील कांहीं. त्यांचा उत्साह मावळलेला दिसे. कोण्यातरी भयकर कोड्यांत ते गुरफटलेले दिसत. अंधाऱ्यावडाखालच्या सर्वांचे डोळे—लक्ष्मण पाटलाच्या छकड्याच्या वाटेकडे लागले होते. मोठया आशाळभूतपणे ते लांब नजर फेकत छकडयाच्या आवाजागणिक. दुसराच छकडा येत असल्याचे दिसलें की, त्यांची निराशा होई; पण ती भावना क्षणीकच हृदयाचा ताबा घेई. परत त्यांचें डोळे वाटेकडे अन् हृदय डोळ्यांच्या मागोमाग. त्यांची उत्कंठा वाढत होती; जास्त जास्त अधीर होत होते ते.

‘ ते पाहा आले. ’ एक उद्गारला. त्याचा हात छकडयाच्या दिशेनें पुढें सरसावला.

‘ अरे ते त खडू लायन्याची जोडी व्हय ! ’ दुसऱ्याने तितक्याच तत्परतेनें पहिल्याचें म्हणणें खोडून काढलें.

अखेर खूण पटली. सारे लोक एकत्र गोळा झाले. छकडयाजवळ प्रथम कोण जातो याची चुरसच लागली होती त्यांच्यांत जणूं. छकडा जवळ येत

होता. जनसंमर्द पुढें पुढें लोटला जात होता. अखेर गणा महारानें बैलांचे दोर ओढले, छकडा थांबला; फेसाळलेल्या तोंडानीं टिक्या चंद्रयाची जोडी ऐटींत उभी राहिली. लक्ष्मण पाटील छकड्यांतून उतरतांच लोकांचा गराडा पडला त्यांच्या भोवतीं. मोठ्या मुष्कीलीनें कांहींनीं वाट करून दिली त्यांच्यासाठीं अन् एकादाचें आणलें त्यांना अंधाऱ्यावडाखालीं. जनसंमर्द त्यांच्या पाठीशींच होता.

'नऱ्या, आन् पानी !' लक्ष्मण पाटील तढवावर बसतां बसतांच म्हणाले. अंधाऱ्यावडाची विहीर लोकलबोर्डाची होती. नऱ्या महारानें विहिरींत पोहोरा घातला. दोन झोक्यांतच त्यानें तो वर काढला. लोटा भरून तो दोन्हीं हातांत धरला त्यानें. मोठ्या अदबीनें नेवून दिला तो लक्ष्मण पाटलांना. उजव्या हातांत तांब्या घेऊन पाटलांनीं दोन घोट घेतले आणि परत दिला नऱ्या जवळ तो तांब्या.

सारा महारवाडा आमंत्रण देऊन मुद्दाम बोलावण्यांत आला होता. सारेच जरी नाहीं तरी निम्यापेक्षां थोडे जास्त महार जमले होते अंधाऱ्यावडाखालीं आज. 'यारे गडे हो ! घ्या पानसुपारी !' लक्ष्मण पाटलानें तढवापासून बऱ्याच अंतरावर उभ्या असलेल्या एका घोळक्याला उद्देशून हांक दिली. कचरतच पण एकामागें एक असे आले ते. तढवावर पाय टाकायला ते धजेनात. पण 'अरे, मी हाओना अथीं ! भेता कोनाले ? ' लक्ष्मण पाटलांच्या ह्या वाक्यांसरशीं त्यांना धीर आला. तढवावर गेले ते भीतभीतच. पहिल्याला पाटलांनीं स्वतः विड्याचीं पानें दिलीं उचलून. 'बसारे ! घ्या पान !' त्यांच्या आज्ञेनें जास्तच धीट झाले ते. त्यांनीं पानदानांतलीं विड्याचीं पानें घेतली न् विडे करायला लागले ते. सारागांव तढवाभोंवतीं उभा होता. लक्ष्मण पाटलांच्या मतांचीं तेवढीं माणसें लक्ष्मण पाटलामागें होतीं. त्यांनीं घेतली पानसुपारी महारमंडळीबरोबर. वयोवृद्ध लक्ष्मण पाटलांना सर्वांनीं सोनें देऊन नमस्कार केला. महार मंडळीस देव पावल्याचा आनंद झाला. लोक गांवाकडे येत होते.

लक्ष्मण पाटलांचें अनुकरण करून कांहीं स्पृश्यमंडळींनीं महाराला धुरीवर बसवून छकडे सोडले. कांहींनीं नऱ्याच्या भाऊबंदांच्या हातचें पाणी पिण्याची

पंक्ती संधली तर कांहींनीं गणाच्या गणगोताबरोबर एकाच तढवावर पानसुपारी घेतली. पाटील इष्टमित्रांसह घराकडे येत होते.

\+ \+ \+

' पाटलाच्या घरांतला झाला म्हनून काय झालं? अशानं गांवगाडा कसों चालील ? पन तो एक निंढग्या निंघाला, तरी हे लेकाचे म्हारडे ! याहीनं काहाले त्याच्या नांदी लागाव ? आपल्या पायरीनं रायता नाहीं येत भावस-सऱ्याईले ? जास्ती काहाले, सकायच घ्याना ! एका रोजांत बंदोबस्त करतो या उचल्याईचा ! पन तुमी मातर माह्या बाजूले राहा ! या लक्ष्याले त नाक घासत इयाले लाईल माह्या बैठकींत !.. ...! '

' पन पाटील, लक्षीमन पाटलाच्या बाजूलेई त खूप लोक हायेत ! '

' अरे हो ! मले काय माहीत नाहीत ते ? तो उदेभान, नाम्या, चंद्रया अन् तो सुक्या हेच कानी आगोलीचे ! पन ध्यानांत ठुवा म्हना, हाई बयराम पाटील व्हय ! '

सुपोबाच्या मढींत कांहीं म्हातारे जमले होते. लक्ष्मण पाटलाचे चुलतभाऊ बळीराम पाटील बोलत होते. ' असं करू नको ' असा बळीराम पाटलांनीं लक्ष्मण पाटलांना दिलेला सल्ला त्यांनीं मनावर घेतला नाहीं. बळीराम पाटील वयानें मोठे असल्याकारणानें आजपर्यंत त्यांचें म्हणणें प्रत्येक वेळीं लक्ष्मण पाटील ऐकत आले. ह्याचवेळीं तेवढें त्यांनीं म्हाताऱ्याला बाजूला सारलें. गांव-गाड्याचा खेळखंडोबा झाला होता. बळीराम पाटलांच्या हृदयांत अपमानाची आग भडकलेली होती. सोयऱ्या धायऱ्यांत पुढें होणाऱ्या नाचक्कीचें विद्रूप चित्र त्यांच्या डोळ्यांपुढें दिसत होतें. चिडूनच ते बोलत होते सर्वांसमक्ष.

' कुठी हाये रे तो इठ्या ?' बळिराम पाटील मोठ्यानें प्रश्नार्थक उदगारले-

' जी, बावाजी ! '

' खबरदार, त्या लक्ष्याची हजामत करशील तर ! गांवांत नाहीं राहू देनार तुले ! समजलं ? '

' बरं बावाजी ! '

'अन् तो नांगोवठी आला कानीरे ?'

'जी, आलो बावाजी !'

'लक्ष्याचं धुनं बंद कर आज पासून !'

'हो जी ! बावाजी !'

'या बलुतेदाराईले सांगतो सव्र्याइले मी ! पन तुम्ही आमी सर्वाईनं लक्ष्या अन् त्याच्या जोडीदाराईचं पानी, चिलम अन् तढव बंद केलं पाहिजे ! जातीबाहीर पळूल्याशिवाय त्याहीले नाही कयनार बयराम पाटलाचा दनका!! सकाय त्या बंडाप्पाले सांगून लेकाइले गांवांत तेलमीठई भेटू देत नाही ! मंग पाहू कसं करतात ते ! वाडवडीलाईची चालरीत काही, काही नाही ठुलं याहीनं ! काही म्हनलं की, म्हनतात गांधीबुवा म्हनते ते आमी करतो ! अरे पन लेकहो, तो गांधीबुवा काय अवघ्या वह्यवाटी सोडा म्हनते !...!'

× × × ×

बळिराम पाटील फार करारी माणूस. एकदा तोंडून शब्द निघाला कीं, मग जान जावो नाहीं तर जमाना होवो, त्याप्रमाणें घडलंच पाहिजे. बळिराम पाटलांचा निर्धार म्हणजे काळ्या दगडावरची रेघ. त्यांनीं सुपोबाच्या मढींत चार–चौघांदेखत जें ठरविलें तें बरोबर कृतींत उतरविलें. लक्ष्मण पाटील अन् त्यांचे साथीदार जातीबाहेर पडले. न्हाव्यानें त्यांची हजामत करायचें नाकारलें, धोबी धुणें धूतना, भाऊबंध कार्यप्रसंगाला येईनात, अन् सोयऱ्या-धायऱ्यांत देखील अशा पत्रिका वाटल्या गेल्या कीं, ह्या बाटग्यांशीं सर्व प्रकारचा संबंध तोडावा. त्या सर्वांची चिलम बंद झाली, त्यांचें पाणी वर्ज्य झालें, अन् तढव पण बंद झाला.

पंधरवड्यानंतरची गोष्ट. मोर्शीकर पाटलांचे घरीं वर्षश्राद्ध होतें. किसन पाटील मोर्शीकर म्हणजे भलीमोठी असामी. इतर सोयऱ्याप्रमाणें बोपुरीकरांना पण आमंत्रण होतें. लक्ष्मण पाटील अन् बळीराम पाटील यांच्या एकामागून एक अशा दोन दमण्या सुटल्या. मोर्शीला गेले. कार्यप्रसंगीं वाद नको म्हणून लक्ष्मण पाटील सरळ पाहुण्यांच्या बिऱ्हाडीं न जातां आपल्या मित्राकडे उतरले. किसन पाटील मोर्शीकरांना, बोपुरीची हकीकत अगोदरच ऐकून

कळली होती. लक्ष्मण पाटील, पाहुण्यांच्या बिऱ्हाडीं न येतां मित्राकडे उतरले. हें ऐकून त्यांना आश्चर्य वाटलें नाहीं. ते त्यांना तिथेंच भेटायला गेले. 'गांवातल्या गोष्टी गांवांत विसरायच्या असतात. सोयऱ्यांना सगळे सारखेच. बळिराम पाटीलदेखील येथें बखेडा करून घरांतलें भांडण चव्हाट्यावर मांडणारे नव्हेत!' इत्यादि प्रकारें लक्ष्मण पाटलांची समजूत घालून किसन पाटलांनीं त्यांना आपल्याबरोबरच आणलें.

वाड्याच्या चौकांत पंगत बसली होती. पात्रें वाढून झालीं होतीं. आतां बुवाच्या हुकुमाचीच काय ती वाट होती. इतक्यांत पुढें किसन पाटील अन् मागें बळीराम पाटील अशा रीतीनें दोघांनीं वाड्यांत प्रवेश केला.

'या किसन पाटील! अथी ह्यायेत दोन पात्रं!' बसलेल्यांपैकीं एकजण मोठ्या आवाजांत किसन पाटलांना उद्देशून उद्गारला.

'अहो! किसन पाटील! तुमाले असं कऱ्याचं होतं त मंग आमाले काहाले बलावलं अथी? ह्या बाटग्याले आमच्या पंगतीत बसोता? हा पाहा चाललो...?---!' पानावर बसलेले बळीराम पाटील उठून मोठ्यानें बोलत होते. सर्वांचे डोळे उभ्या असलेल्या त्या त्रयमूर्तिकडे लागलेलें होतें. सर्वत्र चिडीचिप् होतें. लक्ष्मण पाटील आल्या पावलींच परतले. त्यांच्यामागें किसन पाटील पण गेले.

'नमःपार्वती पते हर हर महादेव!'

बूवांनीं हुकूम दिला.

'बसा! घ्या!' च्या गोंधळांत जेवण सुरू झालें.



# इलेक्शन्‌ची विलक्षण कथा ! : :

" पाटील साहेब ! या इलेक्शन्‌ला तुम्ही उभे तर रहा; कसे निवडून येत नाहीं तें मी पाहतों. मागच्या इलेक्शन्‌चे वेळीं आपण मोठीच चूक करून आपलं नुकसान करून घेतलं. त्याचवेळीं जर सिरसोलीच्या पाटलाला दोन हजार रुपये कर्जाऊ दिले असते, तर दादा पाटलानं आपल्या गांवचीं सारीं मतं तुमच्या हिरव्याच पेटींत टाकलीं असतीं. अन्‌ वाघोलीच्या गुजाबरावची प्रॉमिसरी नोट फाडून टाकली असती तर सितापूर, लांबकानी, गिरजगांव, वसानखेड, बालमपूर, वाकोडी, साखरगव्हान, कन्हारखेड, अन्‌ टेंबलाई इतक्या गांवांतून एकही मत दुसऱ्या पेटींत पडलं नसतं. " सोपानराव आत्म-विश्वासात्मक व निश्चयीवाणीनें भुजंगराव पाटलाशीं, त्यांच्या दिवाणखान्यांत बसून बोलत होते. भुजंगराव हे वऱ्हाडांतील जामगांवचे राहणारे.

भुजंगरावांचा व सोपानरावांचा हा दिवाणखानी संभाषण-विधि चालूं असतांच, पडसापूरचे हेडमास्तर दिवाणखान्यांत प्रवेश करते झाले. भुजंगराव अन्‌ सोपानराव यांना अदबीनें लवून मुजरा करून अवचितराव मास्तर त्यांच्या आरामखुर्चीजवळ उभे राहिले.

" बसाना मास्तरसाहेब त्या खुर्चीवर ! " जवळच्याच खुर्चीकडे बोट दाखवून सोपानराव म्हणाले. भुजंगराव पाटलानें सोपानरावांना साथ दिली. मोठ्या अभिमानानें अवाचित्‌राव उथळे खुर्चीवर बसून खेकारले.

" मी एक मुद्याची गोष्ट सांगण्याकरितां लगोलग पायींपायींच आलों मालकसाहेब ! बासनापूरचा मास्तर आपल्या विरुद्ध-पार्टीनें फोडला असून साऱ्या गांवांत तो घोंटाळा करीत आहे. दोन दिवसांत त्याच्या बदलीचा हुकूम सोडून त्याला जर चिव्हानखेडला पाठवाल तर गांव फुटत नाहीं तुमचं. मास्तरची बायको बाळंतीण होऊन आठच दिवस झाले, म्हणून कदाचित्‌ तो आण्याकरितां कांकूं करील अन्‌ तुमचेकडे बदली न करण्याच्या विनंतीचा अर्ज

करील; पण या वेळीं त्यांचें कांहींच ऐकूं नका. फार झालं तर त्याला असं लिहून पाठवा कीं,तुम्हीं सध्यां जाणेंच भाग आहे. कुटुंब पाहिजेतर मागून न्या."

सोपानराव तालुका-बोर्डचे चेअरमन असल्यामुळें त्यांनीं तावडतोब या कारस्थानाची अंमलबजावणी करण्याची खात्री अवचितराव मास्तरला दिली.

" अवचित्राव, तुमच्यावर आमचा आतां पक्का विश्वास आहे बर कां ! गांवांत वाईटपणा येऊं नये म्हणून तुम्ही त्याहि पार्टीशीं मिळून रहा. तुमचा कांहीं फायदा होत असला तर तोहि करून घ्या. जेवणखाण, चहा–पान, सिग्रेट सर्व मजा करून घ्या तिकडून. आमची बदनामीहि करा फार झालं तर त्यांच्याजवळ. पण त्यांच्यांत घुसून तिकडच्या सर्व आंतल्या गोष्टी मात्र रोज आमचेकडे माणूस पाठवून कळविल्या पाहिजेत. हे वीस रुपये राहूं द्या खर्चासाठीं तुमचेजवळ. आणखी लागले तर सध्यांचे तुमचे जवळून खर्च करा व आमच्या नांवानं मांडून ठेवा. "

अवचित्राव मास्तरच्या हातावर सोपानरावानें पंधरा रुपये टाकले, अन् सध्यां पांच रुपये चिल्लर नाहींत म्हणून पुढच्या वेळीं घेऊन जाण्यास सांगितलें.

आपल्या डायरींत भुजंगरावचे नांवें वीस रुपये मांडून ठेवण्यास ते विसरले नाहींत ! अवचित् मास्तर निघून गेल्यावर भुजंगराव पाटील सोपानरावांना म्हणाले......

" तुम्ही म्हणतां म्हणून उभा राहतों मी सोपानदादा; पण पैशाचें कसें होईल कांहीं समजत नाहीं. मागच्या इलेक्शन्च्या वेळीं बत्तीस हजार रुपये लागतील असा अंदाज होता अन् पुढें बावन हजारावर लान येऊन ठेपली. जेमतेम त्या कर्जांतून जीव जरासा वर निघतो न निघतो तर पुन्हां हें इलेक्शन् आलं. आतां तर, इलेक्शन् म्हणतें मांडून पाहा अन् घर म्हणतें बांधून पहा; अशी गोष्ट होऊन राहिली आहे. दुसऱ्या पार्टीचे लोक त्यांच्या मतदारांना शिरापुरीची पंगत करतील पोलींगचे दिवशीं, तर आपल्याला जिलबीची तर करणं भागच पडेल. अन्नाचा मार सर्वांत भारी असतो सोपानदादा. मागच्या वेळीं चिव्हानखेडचे अन् टेंबलाईचे सारे लोक, अजाबरावाच्या पंक्तींत तुपांत बुडले; म्हणून तर मी पडलों. तुपाचा खूप पेल केला त्यानं. आपल्याकडे

वरणभात पोळीच होती. तुम्हाला मी त्याहि वेळीं म्हटलं होतं कीं, आपण केशरीभात करूं हो सोपानादादा; पण तुम्ही सुस्ती केली. अखेर काय झालं? पांच साहाशें रुपयांकरितां बावन हजार रुपयांना ठोकर बसली, अन् साऱ्या सव्वाशें मतांनीं तर मी पडलों. सव्वाशें जणांनीं फारच फार झालं तर बत्तीस शेर तुप खाल्लं असतं, अन् चिल्लर खर्च आला असतां कांहीं; पण इलेक्शन् मात्र जिंकलं असतं आपण. यंदातरी तशी गलती करूं नये. सर्व लोकांना सांगा आपल्या कीं, आपल्याकडे जिलबीची पंगत जोरदार उडणार आहे म्हणून. अन् व्याख्यान देणाऱ्या दोनतीन वकिलांनाहि घ्या बोलावून आपल्यासाठीं. मोटारींत बसून त्यांनीं फिरायचं, खेड्यापाड्यांच्या मतदारांना बरोबर आपल्याकडेच मत द्या म्हणून सांगायचं, अन् खर्चासाठीं म्हणून रोज दोनतीन रुपये आपल्या जवळून घ्यायचे. पुन्हां वरणभात पोळीचें जेवण. चहा, पान, सिगारेट, सर्व खर्च आपला. व्याख्यान मात्र जीव तोडून दिलं पाहिजे त्यांनीं. नाहींतर मागच्या वेळीं कोल्हाटपुरावरून ते वकील साहेब आणले होते ना; त्यांचें ऐन व्याख्यानाचे वेळीं पोटच फुगे. आपलें व्याख्यान मग 'कान्सल' अन् विरुद्ध पार्टीचा तो व्याख्यानाचा 'प्रोग्राम्' मात्र घडावयांत चालू रहावयाचा.

दुसरी एक गोष्ट ध्यानांत ठेवा सोपानदादा. आष्टीच्या मरामायचं वरचं छप्पर सडून गेलं. त्या गांवांत जाऊन नव छप्पर करून देण्याचं त्यांना वचन द्या. सुबानपूरच्या मारुतीचा पार खचून पडला आहे ; तो नवा बांधून देतों म्हणून सांगा. वासनखेडच्या माहारपुऱ्यांत एकही विहीर नाहीं ; तिथं जाऊन ती बांधून देतों म्हणून सांगा. अर्जुनगांवच्या नदीचा पाणोठा सबंध उखडून गेला आहे; त्याची रिपेरी करून देतो म्हणून सांगा. अन् चितारखेडच्या झाडींत मोठं जनावर आहे ; तें गांवकऱ्यांच्या ढोरांवासरांना मोठा धोका देतें; बंदुकीनं त्याचा धुव्वा उडवितो म्हणून सांगा. अन् एक गोष्ट मुद्याची सांगावयाची राहिली सोपानदादा. पोलिंगचें दिवशीं कांहीं गांवीं एक्के उभे करून ऐनवेळेपर्यंत भजन चालू ठेवा. भजन आटोपलें कीं लगेच भोजन, अन् भोजन संपलें कीं लगेच सारे लोक आपल्या पेटीकडे घेऊन जाण्याची व्यवस्था करा. आणखी काय करायचें तें तुम्ही सांगा; म्हणजे तुमच्या आमच्या सल्ल्यानं सारी तयारी करून टाकूं.

अन् भोजन चालू असतांना मात्र उगीचच आपलं मधून मधून गमतीनं म्हणत असावं कीं, " समाधानानं होऊं द्या ! समाधानानं होऊं द्या ! " " मतं कोणाकडेहि द्या, पण भोजन मात्र समाधानानं होऊं द्या ! चार चौघांच्या मुखीं अन्न पडलं म्हणजे आनन्द आहे बापा आम्हाला !" " जन जनार्दनाच्या दुव्याची बरोबरी कशालाच नाहीं !" याचा परिणाम पहा काय होतो तों !

" भुजंगराव, मी सर्व पाहून घेतों, पण एक मोठी बानीची गोष्ट आपण केली पाहिजे. आपल्या पट्ट्यांत जेवढं म्हणून पेट्रोल असेल, तेवढं आजच नगदीनं खरेदी करून ठेवायला पाहिजे. जास्त आंगावर पडलं तर हरकत नाहीं; पण वेळेवर पेट्रोल मिळत नाहीं मग भुजंगराव. अन् पुन्हां त्यांत ग्यानबाची मेख अशी आहे कीं, विरुद्ध पार्टीच्या लोकांस पेट्रोलच मिळालं नाहीं तर काय तूप टाकून मोटारी पळवतील ! मोठे मोठे शेठ तर इलेक्शन-साठीं उभे राहतात अन् मुंबई-कलकत्त्याचं सारं पेट्रोल लाखों रुपये खर्च करून आगावू खरेदी करतात. विरुद्ध पार्टीच्या साऱ्या नाड्याच थंड पडतात या खुबीनें. मला वाटतं आपण पांच-सहा हजार रुपयांचं पेट्रोल घ्यावं भुजंग-राव आज-उद्यांच. अन् दुसरी गोष्ट—पेपरमिंट अन् बत्तासे घेऊन ठेवावे लागतील आपल्याला पुष्कळसे. आतांपासून गांवोगांवच्या लहान लहान पोरांचे तुंगेचे तुंगे जमवून रोज सकाळीं अन् संध्याकाळीं ' भुजंगराव पाटलांसच मतें द्या ! भुजंगराव पाटलांसच मतें द्या !' असें ओरडत त्यांची मिरवणूक काढावी लागेल अन् त्या मुलांना पेपरमिंट आणि बत्ताशांचा पेला करावा लागेल. विरुद्ध पार्टीचे लोक मुरमुरे फुटाणे त्यांना देतील, अन् आपण देऊं बत्तासे; त्यामुळें त्यांना तर हर्ष होईलच, पण त्यांच्या आई-बापांनाहि वाटेल कीं भुजंगराव पाटील मोठा उदार माणूस आहे आपणही त्यालाच मतें द्यावींत.

" अन् एक दुसरीहि अजब युक्ति आमचा लहान भाऊ सांगत होता त्या दिवशीं. भानखेडची सुंदर कोल्हाटीण, इलेक्शनच्या दिवशीं जर आपल्या वाड्यांत बोलावली, अन् गायनाची बैठक जर केली; तर खूपच मजा होईल. विरुद्ध पार्टीचे जे मेखे असतील त्यांना मोठ्या मानानं सात-सातदां बोलावणं पाठवावं त्यादिवशीं. एकदां कां सुन्दरीच्या नखरेल गह्यऱ्या

नजरेनं अन् जहरी हावभावानं आपला मारा सुरूं केला कीं, इलेक्शन् फिलेक्शन् पार विसरलेच समजा आपल्या विरुद्धपार्टीचे जानबा पाटील. अन् त्यांत पुन्हां अस्सल अस्सल मसाल्याच्या भारी भारी किंमतीच्या बाटल्या आणून साराच बार उडवून द्यायचा रच्चून. एवढ्या इंद्रपुरींतून कोणाचं लक्ष त्या इलेक्शन्मधें जाणंच शक्य नाहीं. अशी झकास युक्ति आहे भुजंगराव ही !" सोपानरावचें हें तत्त्वज्ञान भुजंगरावांना बालम्बाल पटलें.

" वा ! वा ! तुम्ही तर खूपच सांगितली सोपानराव ! रामबाण इलाज !" सोपानरावाच्या हातावर हात मारून भुजंगराव सात मजली हांसत म्हणाले.

" सोपानराव ! मागच्या इलेक्शन्च्या वेळीं एक गोष्ट ध्यानांतच राहिली नाहीं. आतां मात्र ती बिलकूल विसरून उपयोगी नाहीं. अशी झकास युक्ति आहे ती; कांहीं विचारूं नका ! विरुद्धपार्टीचे जे मेंबे असतील कीं नाहीं; त्यांना ऐन पोलिंगच्या दिवसाच्या संधानांतच कुठून कुठून पत्रं पाठवायचीं ! हें काम मात्र बरोबर धोरण पाहून करावयाला पाहिजे ! तेलंगखेडचा आन्याबा म्हाली मोठा हुशार या करामतींत. कोणचं संधान कुठें आहे, हें त्याला अगदीं हुबेहुब ठाऊक. तुम्हाला काय सांगूं सोपानराव त्याची करामत ! परवांचे दिवशीं आमच्या एकटांगीवर बसून तो अन् मी खकानवासल्याला गेलों होतों. रस्त्यानें मला पानाचीच तलप आली. रस्त्यांत कुठून आणणार पान ! पण आन्याबा म्हणाला, तुम्ही बैलाचे कासरे धरू लागा पाटील साहेब. या रस्त्यावरच्या वावरांत निंदण सुरूं आहे; मी आणतों तिथून पान-सुपारी. गेला बुवा अन्याबा तिथं; अन् त्यानं बरोबर जमवलं सोपानराव. एका सुनवारीला सांगितलं कीं ' पोरी ! आम्ही तुझ्या बापाच्या गांवचेच पाव्हणे आहोंत ! ओळखलं कीं नाहीं आम्हांला ? तूं लहान होती तेव्हां कच्छीच्या दुकानासमोरून भातकं घेऊन पळत होतीस पोरी ! अन् आतां तुझ्या काकाला ओळखत नाहीं ? बर पानसुपारी तर दे अगोदर; बैल उभे रहात नाहींत. तिकडून येतांना तुझ्याच घरीं घंटाभर थांबून जाऊं !"

" सोपानराव ! आणली बुवा पानसुपारी आन्याबानं अशी खुबी करून ! केवढा बिलंदर आहे आन्याबा पाहा !"

" आन्याबाचा उपयोग आपल्याला अशीं खुबीचीं पत्रं पाठविण्यासाठीं चांगला होईल सोपानराव ! तारतम्य पाहून अन् कधीं कधीं बितमूबातमी काढून, विरुद्ध पार्टीच्या मेख्यांना त्यांच्या जवळच्या कांहीं नातलगांच्या नांवांचीं पत्रं इलेक्शनच्या संधानांत बरोबर पोंहोचलीं पाहिजेत. कोणाला आजारी-पणाचें पत्र यावयाला पाहिजे एखाद्या नातलगाकडून. कुणाला मरणाचें पत्र. कुणाला लग्नाचें पत्र. कुणाला सोयरीकी जमविण्याचें पत्र. कोणाला साखर-पुड्याचें पत्र. कोणाला शेत खरेदी करण्याचें पत्र. कोणाला खिलारी बैलांची जोडी विकावयाची असल्याचें पत्र. कोणाला सट्ट्याचें पत्र. कोणाला सत्यनारा-यणाचें पत्र; अशीं खूप पत्रं बरोबर संधान पाहून पाहून मोठ्या चतुराईनं पाठवायला पाहिजेत. या खुबीनं, इलेक्शनच्या दिवशीं विरुद्ध पार्टीचें पांचदहा मेखे जरी या चक्रांत येऊन गैरहजर राहिले, तरी चारपांचशें मतांचा मोंढा मारलाच म्हणून समजा आपण !

" अन् तुमच्या हातांत तर सोपानराव; साऱ्या मतांचा गड्डाचा गड्डाच आहे. कोंडवाड्याचा नोकर तुमच्या हाताखालीं, ग्रामपंचायत तुमच्या हाता-खालीं, सारे मास्तर तुमच्या हाताखालीं, मास्तरणी तुमच्या हाताखालीं, पाटील तुमच्या हाताखालीं, जागले-कोतवाल तुमच्या हाताखालीं; अन् या साऱ्यांचे संबंध नेहमीं येणार गांवगाड्यांत ! तेव्हां यांच्यावरच खुशीनं म्हणा, जबरदस्तीनें म्हणा, बोझा टाकला कीं, पहा गडे हो ! आपल्या भुजंगरावांनाच मतं पडलीं पाहिजे साऱ्या लोकांचीं ! एक मत फुटतां कामीं नाहीं विरुद्ध पार्टीकडे !" तर काय मजाल आहे त्यांची कीं, ते हें काम करणार नाहींत ! सोपानदादा ! त्यांच्या मनांत कांहींहि असो; पण बिचाऱ्याचें पोट तुमच्या हातीं आहे ना; पोटापुढं नाहीं चालत सोपानदा कांहीं !"

" तें तर करणारच आहे मी पाटील ! त्यांची लेकांची काय अस्सल आहे माझ्याविरुद्ध जाण्याची ! चिमणीसारखे चिव् चिव् करतील, भडाभड नोकरी-वरून काढून टाकले तर ! आज एक लाखाचा कारभार तुमच्या आशिर्वादानं

हातांत आहे; तो कांहीं फुकट नाहीं! त्या दिवशींचीच गंमत पहा ना! तो आपल्या बोर्डाचा सेक्रेटरी नाहीं कां नेमला आपण परवां? तोऽ साकरखेडकर कां टाकरखेडकर असं कांहींतरी नांव आहे त्याचं! बी. ए. पास झाल्याचं त्याला केवढं घमंड! त्या दिवशीं शिपाई कुठं बाहेर गेला होता म्हणून मी त्याला म्हटलं, 'अरे बाबू! जराशी ही 'छापी' तिकडून भिजवून घे बरं!' केवढा कां-कूं करायला लागला बेटा! पण पुन्हां म्हणतांच गुपचुप गेला न् आणली भिजवून छापी! जाणार नाहीं कुणाचा! सव्वाशें रुपये कोण्या बापाचे घेईल! अन् कोण हुंगतो आतां अशा बी. ए. अन् एम्. ए. ना! आमच्याकडे कीं नाहीं पाटील साहेब, असे बी. ए. अन् एम्. ए, अन् एल्. एल्. बी. अन् सारी इंग्रजीची बाराखडीच कधीं कधीं पाया पडत येते हो आमच्या; कीं कसंहि करा साहेब, पण कुठंतरी तुमच्याकडे नोकरी द्या लावून. तुमचे उपकार जन्मभर विसरणार नाहीं. आम्ही खूप मस्करी करतो अशा फाल्तूंची अन् देतो वाटेला लावून. कोणाकोणाला द्यायच्या हो नोकऱ्या लावून! अन् पुन्हां बेइमान मोठे बेटे! परवां त्या आपल्या घाटपाडीच्या चेअरमन साहेबांची केवढी बदनामी केली एका नालायकानं! साऱ्या लोकाना सांगितलं त्यानं कीं, 'मी नोकरी मागण्यासाठीं गेलों होतों तर चेअरमन साहेब मला म्हणाले कीं, 'पहिल्या बारा महिन्यांचा पगार मिळालाच नाहीं असें समजून काम करण्याची तयारी असेल तर पाहीन कांहीं खटपट करून जमली तर! कारण, त्या खटपटीसाठींच न् उलाढाली साठींच खूप खर्च न् झटके न् हिसके पडणार आहेत मला! तुमच्या करितां पाहिजे तर ते मी करीनहि बुवा; पण पैशाचा खर्च मात्र तुम्ही सोसला पाहिजे!' अशी बोंब उठविली बुवा त्या गद्धयानं चेअरमन साहेबाविरुद्ध. खरंच आतां साहेबांनीं त्याला तसं म्हटलं असेल पाटील! याच्या लेकाच्या त्या तीनचारशें टिकल्यानंच संसार चालणार आहे त्यांचा! हलकट लेकाचे! नोकरी नाहीं मिळाली कीं, लागले कांहींच्या कांहीं बोंबा मारायला आमच्या नांवानं! पण कानांवर कोण घेतो हो अशा फाकेमस्तानांचं! कोणीहि झालें तरी आपल्याकडूनच बोलणार, कीं अशा या खुट्यावरच्या कावळ्यांकडून!

" पाटील साहेब ! आमचे अनुभव काय सांगावे तुम्हाला ? असे एकाहून एक अवलाई भेटतात हो आम्हाला ! त्यांची कांहीं चालत नाहीं तें सोडून द्या; पण बेटे कुलुलकुलुल केल्याशिवाय मात्र राहात नाहींत ? परवांचं त्या मास्तरीणचं तें प्रकरण; केवढं बेस्यांनीं भडकवलं होतं ? तिला म्हणे फुकटाचाच पगार मिळतो आमच्याकडून ! शाळेंत मुलीहि नाहींत अन् तिला शिकवावेंहि लागत नाहीं !

" एका मास्तरनं तर दोन महिन्यांपूर्वीं जिकडे तिकडे बोंब मारली होती कीं, अमुक अमुक गोष्ट कबूल केली नाहीं तर कुठल्या कुठं तुमची बदली करण्यांत येईल ध्यानांत ठेवा; असा त्याला दम देण्यांत आला म्हणून ! अन् दूर कशाला भुजंगराव, आतां आपल्या घरीं म्हाताऱ्याचं श्राद्ध नाहीं का झालं! त्यावेळीं सहजच मी त्या बावळे मास्तरला म्हटलं कीं, रिकामेच राहतां मास्तर तुम्ही दुपारून घरीं, तर आमच्याकडे येऊन बसल्या बसल्या ५-२५ पत्रावळी लावून जा ! मास्तर आला न् त्यानं पत्रावळीहि लावल्या, पण साऱ्या जिल्ह्यांत बोंब केली त्यानं या साध्या गोष्टीची ! असे बेइमान लोक असतात हे भुजंगराव ? अन् म्हणून यांची दयामाया आम्हाला मुळींच येत नाहीं. यांना कुचललेंच पाहिजे असे. आमच्या हातांत आतां लाखों रुपयांचा कारभार असतो तेव्हां असे किती तरी येतात बेटे पाया पडत !

" हो ! तर, गोष्ट निघाली होती तुमच्या म्हणण्यावरून; अन् मी तिकडेच वाहवत गेलों बोलतां बोलतां ! अहो, रात्रंदिवसाचा तोच धंदा, तेव्हां कोणतीहि गोष्ट निघाली कीं; तिचे शेंकडों अनुभव सांगावेसेच वाटतात, म्हणून हें असं होतं. तुम्हाला येईलच आतां सगळे अनुभव या प्रकरणांतले ! तर सांगण्याचा मुद्दा असा कीं, तुमच्या म्हणण्याप्रमाणें, या सगळ्या आमच्या हाताखालील लोकांना मी चांगलाच जतावून देतों तुम्हालाच मतें देण्याबद्दल ! अन् घोंटाळा करतीलच तर मरतील लेकांचे अन्नपाण्यावाचून ! आपलं काय बिघडणार आहे त्यांत ? तुम्ही निर्धास्त राहा पाटील या बाबतींत."

सोपानराव–भुजंगरावांचें बोलणें खूप रंगांत आलें होतें इतक्यांत, पोस्टमननें भुजंगरावांचें नांवचें पत्र आणून दिलें त्यांच्याजवळ. लाडकीच्या जीवाजी सावकारांचें, पत्र होतें तें. तें पत्र वाचण्यांत अर्धा तासपर्यंत भुजंगराव गढून

गेले होतें. अन् सोपानराव, हुक्क्याची नळी तोंडांत घालून गुड् गुड् गुड् गुड् करीत होते.

"जमलं सोपानराव एक दुसरं संधान!" पत्र समोरच्या टेबलावर ठेवीत भुजंगराव मोठ्या उल्हासानें बोलूं लागले. "जीवाजीचं पत्र आलं आहे लाडकीच्या. त्यांचीं जेवढीं कुळं आहेत त्या सर्वांना जिवाजीनं खणकाऊन सांगून टाकलें आहे कीं, 'भुजंगरावांनाच मतं पडलीं पाहिजेत तुमचीं सर्वांचीं व तुमच्या नात्यागोत्याच्या व दोस्तमित्रत्वांतील सर्व लोकांचीं. तुम्ही जर या वेळीं ही खटपट करीत नसाल तर मग आमची बाकी तरी चुकती करून टाका. म्हणजे तुमचे—आमचे संबंध तुटले. तुम्ही हेंहि करणार नाहीं आणि तेंहि करणार नाहीं तर कोर्टांत आम्ही दावे घालूं!'

"कशी जोरदार खुबी केली जिवाजीनं, सोपानराव! आतां कोठें जातील मतं! वा रे वा जिवाजी!" सोपानरावांकडे पाहून तीन मजली हांसत आपला हर्ष भुजंगरावांनीं व्यक्त केला.

"ही गोष्ट मात्र खूपच जमली पाटील आतां! आतां इलेक्शन् म्हणजे यूँ आहे यूँ!" भुजंगरावांना सोपानरावांनीं सांथ दिली.

"अन् भुजंगराव! मलाहि आतां अशी अशी अशी कांहीं एक अस्सल खुबी सुचली ह्मणाल कीं, कांहीं विचारूं नका. तुमचें भाग्य मोठें सकिंदर आहे पाटीलसाहेब, तुम्ही कांहींहि म्हणा! म्हणूनच तर सारा जोड बरोबर जुळून येत चालला! अहो! एक मात्र आपण केलं पाहिजे पाटीलसाहेब! गडावरचे धुनीधारी बावा आहेत कीं नाहीं—?"

"हो आहेत! कांहीं आहे कां त्यांचं काम?"

"अहो! काम म्हणजे? एका ओकारीनं पोट रिकामं! त्यांच्या सही-निशी एक पत्रक जाहीर करा म्हणावं त्यांना कीं, 'माझ्या साऱ्या भक्तांनीं देवाला स्मरून भुजंगरावानांच मतं द्यावींत!' कीं जमलाच ठोका बरोबर! असा कोण मायचा पूत आहे कीं, बुवाच्या म्हणण्यांतून निघून जाईल?" सोपानदादा खूप आवेशांत येऊन बोलूं लागले.

" वा ! वा ! वा ! वा ! सोपानदादा; तुम्ही तर आतां खुपच काढली. सौ सुनारकी अन् एकच लोहार की ! जमवलंच समजा हें संधान. त्यांत काय मोठं आहे ! पांचशें भक्तांची कढथी कबूल केली कीं काम फत्ते ! " सोपानरावांचे हातावर हात मारून भुजंगराव म्हणाले.

× × ×

भुजंगरावांचें इलेक्शन् आतां खूप गाजून राहिलें होतें. दे. भ. सदाफळे यांनींहि भुजंगरावांच्या युक्त्या सारख्याच निरनिराळ्या युक्त्या शोधून त्यांची अंमलबजावणी करण्याची सुरवात केली होती ! दोन्हीं पक्षाचे वीर, तन–मन-धनें कुर्बान होऊन अहमहमिकेनें झुंजत होते. जनसेवेचें तत्त्व दोन्हीं पक्षांकडून खूप उफाळलें जात होतें. त्याग, सेवा, लोककार्य, जनताप्रेम, राष्ट्रप्रेम, देशहित, स्वराज्य, स्वातंत्र्य; मातृभूमि, आर्यमाता, हिंदुस्थान, बहुजनसमाज-हित, आत्मार्पण, बलिदान, आत्मयज्ञ, शिवाजी, गांधी, टिळक इत्यादि शब्दांची स्वस्ताई झालेली होती; व छापखान्यांतील ह्या शब्दांचे टाइपहि अगदीं झिजून झिजून गुळगुळीत झालेले होते. दोन्हीं पक्षांचे 'लीडर' आपापल्या पक्षाची बाजू घेऊन घेऊन घसा फुटेपर्यंत ओरडून ओरडून सांगत होते कीं, " आमच्या पक्षाच्या उमेदवाराचा त्याग लक्षांत घ्या व त्यालाच मतें द्या. आम्हीं जनसेवेस कधींहि अंतर देणार नाहीं. "

अशीं व्याख्यानें ऐकून कांहीं टणक कवटीचे लोक टोमणेहि मारीत कीं,–

तरच, तरच; साठसाठ हजार रुपये खर्च करून इतकी जनसेवा चालविलेली आहे ती ! या साठहजारांचें भांडवलावर ७ लाख रुपये मिळविण्याची चढाओढ आहे ही नुसती. एरव्हीं एक गुळगुळीत पैसाहि कुणाच्या मढयावर न फेकणारे हे हरीचेलाल, आत्तांच इतके उदार, केवळ जनसेवेसाठीं झाले या म्हणण्यावर विश्वास ठेवण्याइतकी कांहीं आतां दुनिया दुधखुळी राहिलेली नाहीं. प्रेताच्या कपाळावरचें लोणी चाटून खाणारे अन् दुसऱ्याच्या सरणावर आपली विडी पेटवून घेणारे भडभुंजे ज्याअर्थी हजारों रुपये या इलेक्शनच्या लॉटरींत घालीत आहेत; त्याअर्थीं त्यांत आवळा देऊन कोहळा घेण्याची जादू असलीच पाहिजे.

भुजंगराव आपल्या व्याख्यानांतून लोकांना सांगत कीं;–"लोक हो! मी तुमचा आहे व तुम्ही माझे आहांत. मी मेलों तर तुमचे खांद्यावर जाईन अन् तुम्हीं मेलांत तर माझ्या खांद्यांवरून मी वाहून नेईन तुम्हाला. ही गोष्ट जरूर ध्यानीं घेऊन मलाच मतें द्या. समाजाचा अभिमान बाळगा! रक्ताचा अभिमान बाळगा! हाडांचा अभिमान बाळगा! मासांचा अभिमान बाळगा!"

दे. भ. सदाफळे आपल्या व्याख्यानांतून लोकांना सांगत कीं, "लोक हो! आपल्या पक्षाला सत्याचा आधार आहे. तत्त्वाचा आधार आहे. गांधीं-जींचा आशिर्वाद आहे. कॉंग्रेसचा आशिर्वाद आहे. मी देशासाठीं फकीरी घेण्यास तयार आहे. मरण्यास तयार आहे. सर्वस्वाची राख करून त्याची विभूति लावण्यास तयार आहे. ही गोष्ट ध्यानीं घ्या व मलाच आपलीं व आपले आप्तेष्टांचीं मतें द्या. मी तुमचा आहे. मी तुमचा आहे."

लोक म्हणत कीं,–"नमस्कार बाबा दे. भ. महात्म्या! इलेक्शन् संपलें कीं, कुणाचा नमस्कार घ्यायलाहि तुम्ही तयार नसायचे; मग देशासाठीं न् सत्यासाठीं न् राष्ट्रासाठीं मरण्याची तयारी तर दूरच राहिली! बिचाऱ्या त्या महात्म्याच्या नांवावर आपला पोटोबा पोकळ करण्यापलीकडे तुमची लायकी मुळींच नाहीं. खण्डोबाचे नांवावर मुरळ्या आपली चन्दी हबकतात अन् महात्म्याच्या नांवावर तुम्ही आपली दोंदें वाढवितां! ती बिचारी कॉंग्रेस मोठी गंगा असली, तरी ती मधून वाहात जाणारे सगळेच गलिच्छ अन् घाण पदार्थ म्हणजे कांहीं गंगा नव्हे! ते कांहीं गंगेच्या पावित्र्याची बरोबरी करणारे नसतात!

गांजाचे चिलमीपुरती शंकराच्या नांवाची ललकरी मारणारे नकली संन्यासी, अन् निवडून येण्यापुरते म. गांधीचा अन् कॉंग्रेसचा जयजयकार करणारे आप्पलपोटे दे. भ., बुद्धिवान् चिकित्सकांच्या दृष्टीनें सारखेच तुच्छ आहेत. नमस्कार बाबा तुम्हाला न् तुमच्या सोंगाढोंगांना!

× × ×

पोलिंग स्टेशनवर आज खूपच गर्दीचगर्दी होती. एरव्हीं; कोणत्याहि सत्कार्यास मदत देते वेळीं 'चाकाएवढा रुपया झाला' म्हणणारे हाडाचे

बोनाफाईड कट्टु आज अगदीं साध्या चिटोऱ्याप्रमाणें करन्सी नोटांची उधळपट्टी करीत होते; व नोटांचीं पुडकींच्या पुडकीं घेऊन मतांची आराधना करण्यांत दंग होते. दे. भ. सदाफळे आणि भुजंगराव पाटील या दोघांच्याहि मंडपांत लगीनघाई होती, व नवरदेव तर वाऱ्याचे वेगानें भराऱ्या मारीत होते. उमेदवारांचे पित्ते, अनेक गांवमामांच्या कानाशीं कुजबुज कुजबुज करीत होते व त्यांना मंडळींतून उठवून एका बाजूला कोपऱ्यांत घेऊन जाऊन कांहीं घुन् घुन् घुन् घुन् करीत होते. स्वतःच्या माणुसकीची शुद्ध जवळ जवळ विसरलेच होते ते. आपापल्या उमेदवारास त्यांचे पित्ते, बढाया सांगण्यांत दंग होते. कोणी म्हणत होता कीं, " आपल्या विरुद्ध पार्टीच्या मोटारीपुढं आपली मोटार आम्ही अशी खुबीनें दटावली कीं, त्यांच्या ड्रायव्हरचे डोळ्यांत व नाकातोंडांत मातीचे बोकनेचे बोकने जाऊन त्यानें गुदमरूनच जावें. " कोणी म्हणत, " आपल्या विरुद्ध पार्टीची मोटार अमक्या-तमक्या खेड्यांत उभी असतां ती अजिबात पंक्चर करण्याचीच खुबी आम्ही केली. " कोणी सांगत, ऐनवेळीं अमका-तमका त्यांचा मेख्या आम्ही मोटारींत घालून कुठच्या कुठेच नेऊन ठेवला व त्याचीं मतें हबकलीं. कोणी बोलत, विरुद्ध पार्टीच्या मतदारांना आम्ही असें सांगितलें कीं, तुमच्या पेटीचा रंग अमका नसून तमका आहे !

इलेक्षनी—पित्ते बढाया भकत होते व आशाळभूत उमेदवार त्या बढायांतून आत्मानंद उपभोगीत होते. त्यांना स्वर्ग दोन बोटेंच उरला होता असें नसून स्वर्गावर दोन बोटें ते चढले होते !

मतदारांचे थवेच्या थवे पोलिंगवर जमले होते. कुणी पायीं पायींच परगांवाहून आलेले होते, तर कुणी गाडीबैलानें, घोड्यानें, मोटारीनें, सायकलीनें, आगगाडीनें आले होते. त्यांतील कित्येकांना बिचाऱ्यांना आपणांवर कसला प्रसंग आहे याची प्रामाणिक कल्पनाहि नव्हती ! मताची चिठी कुठें टाकावी व कशी टाकावी हा श्रीगणेशाहि त्यांना माहिती नव्हता ! ‘ आतां आमचे मतदार, राजकारणांतील डावपेंच समजण्याइतपत तज्ज्ञ झालेले आहेत ’ असें फक्त त्यांच्याकडून मतें हबकणारे सोकाजी मात्र प्लॅटफॉर्मवरून गेले ३।४ महिने सारखे भकत होते !

वायलाजीनें तर मताच्या चिठीबरोबर अक्षता व पैसाहि पेटींत टाकून तिला मनोभावें नमस्कार केला; 'जे बापा मावली!'

भोपाळरावांना पं.लिंग डायरेक्टरनें सांगितलें कीं,–'पेटीच्यावर भोंक आहे तींतून चिठी टाकून द्या!' भोपाळराव पेटीच्यावर आकाशाकडे पाहूं लागले! पुन्हां समजावून सांगितल्यावर त्यांनीं त्या पेटींत चिठी टाकली!

चिनाबाई तर पेटींत चिठी टाकतांना म्हणाली, 'जे बापा सुर्वेनारावेणा! मले सुकाऽची ढीव बापा!'

पोलिंगवर पंक्तींचाहि धूमधडाका जोराजोरांत चाललेला होता! या पार्टीच्या पंक्तीतून 'सीताकान्त स्मरण जयजय राम!' अशी गर्जना झाली कीं त्या पार्टीच्या पंक्तींतून 'नमक पार्वती पते हरहर महादेव!–' अशी घोषणा करण्याची सारखी चढाओढ लागली होती!

'समाधानानं होऊं द्या! समाधानानं होऊं द्या!' म्हणून मतदारांना कळकळीनें आग्रह चालूं होता दोन्हीं पार्टयांच्या भोजनमास्तरांचा!

× × ×

आज मतें मोजणीचा दिवस! उमेदवारांच्या आयुष्यांतील एक महत्त्वाची वेळा! बचप्राण एकवटून उमेदवार आतुरतेनें जिल्हा–कचेरींत हजर राहिले होते. मतें मोजून झालीं. निर्णय जाहीर झाला.

"भुजंगराव निवडून आले!"

भुजंगराव देहभान विसरले! चोहोंकडे पाहात ते घाईघाईनें उद्गारले, "बॅण्डवाले कुठे आहेत? हारवाले आले नाहींत काय? मिरवणुकीची मोटार कुठें आहे? सभावाले वकीलसाहेब कुठें आहेत? आखाड्याची मुलें जमलीं नाहींत काय? झेण्डे–पताका–लेझीम–आणले नाहींत काय? जमवा सर्व लवकर! मिरवणुकीला वेळ होतोय! मिरवणुकीला वेळ होतोय!"

मोठी मिरवणूक निघाली. भुजंगरावांचा जयजयकार सुरू झाला. सोपानरावादि मण्डळी बेफाम आनन्दांत तल्लीन झाली.

'भुजंगराव झिंदाबाद! भुजंगराव झिंदाबाद!!'

लेझिम खणाणले ! पताका फडफडल्या ! झेण्डे उंचावले ! मुलें हुंदडलीं ! बॅण्डवाले वाजवूं लागले,

" डोळे हे ऽऽ जुल्मी गडे ऽऽ रोखुनि मज पाहुं नको ऽऽऽ "

भुजंगरावांचे गळ्यांत हारांचे खच पडले ! सभेंतून अभिनंदनें झालीं ! आभार–प्रदर्शनें झालीं ! भुजंगराव आतां एम्. एल्. ए. झाले !!

\+ \+ \+ \+

असेम्ब्लीच्या एकंदर नऊ बैठकी झाल्या व त्यांतून लोकहिताचे कितीतरी प्रश्न विचर्चिले गेले; पण ऐन त्यावेळींच भुजंगरावांवर गाढ निद्रेचा अंमल आलेला दिसून येई ! इतक्या दिवसांत, फक्त एकच व्याख्यान दिलें भुजंगरावांनीं त्या असेम्ब्लीहॉलमध्यें.

प्रश्न निघाला होता कीं, अमुक अमुक ईदूचे दिवशीं पन्नास बोकडांपेक्षां अधिक बोकडांची कत्तल केली जाऊं नये.

भुजंगराव एकदम झोंपेच्या पेंगापेंगींतून डुलकी खाऊन सावध झाले व म्हणाले,

" ठीक आहे. पन्नास रुपयांचा माझाहि आकडा मी टाकण्यास तयार आहे ! " हॉलमध्यें एकच हंशा पिकला !

एक मेंबर गंभीरपणें म्हणाले,– " त्यांना फक्त 'पन्नास'चा आंकडाच ऐकायला गेला झोंपेच्या गुंगींत ! त्यांना पुन्हां सगळें समजावून सांगा !"

भुजंगरावांचें हेंच पहिलें अन् शेवटलें महत्त्वाचें व्याख्यान !!



# दोन उपदेशक !  :  :  :

' विठ्ठल ! विठ्ठल ! विठ्ठल ! विठ्ठल ! ' विठ्ठलनामाचा प्रचंड गजर होत होता. नामागणिक टाळ्यांचा कडकडाट उठे. मधूनच खड्या आवाजांत मध्यभागीं उभी असलेली व्यक्ति नामगजराचें पुढारीपण घेई. जनसंमर्द उत्साहित होई अन् नामोच्चाराचा ध्वनि थेट आभाळाला भिडे.

रात्रीं नऊ साडेनवाचा सुमार होता. बेलूर गांवाबाहेरील मारुतीच्या पारावर दोन गॅसबत्त्यांचा झगझगाट दिसे. पाराच्या भोंवतालीं बसलेल्या अफाट जनसमुदायाची सीमा दृष्टीच्या टप्प्यांत नव्हती. त्याच्या अफाटपणाची कल्पना, मधें पेरलेल्या अन् पिंगट प्रकाश देऊन धुराचे डोंबचे डोंब सोडणाऱ्या टेंभ्यानींच तेवढी येई. गांवच्या शिवभावांचें स्वागत करण्याचा लाभ मिळाला होता आज बेलुरेकरांना. गोधडेबुवा ह्याच पारावर कीर्तन करणार असल्याची बातमी वाऱ्यासारखी गेली गांवोगांव. गांवेंच्या गांवेंच उलटलीं होतीं बूवाच्या दर्शनासाठीं आज. गोधडेबुवा म्हणजे शेतकऱ्यांचा प्रत्यक्ष देवच ! मग कां नाहीं होणार इतकी गर्दी ?

कीर्तन सुरू झालें होतें. गोधडेबुवाकडे नाम-गजराचें पुढारीपण होतें. लोक तल्लीन झाले होते.

बुवाच्या अंगांत गोधडीचा कोट होता. त्याला सतरा ठिकाणीं रंगीबेरंगीं ठिगळें होतीं. तो जीर्ण झाल्यामुळें त्याचीं लक्तरें लोंबत होतीं. त्यांच्या कमरेला एक मळकट कापड गुंडाळलेलें होतें, पाय चिरगुटांनीं वेष्टिलेले होते. डोक्यावर पांढऱ्या रांकट केसांचा अस्ताव्यस्त स्थितींतला केशभार अन् चेहऱ्याला तेवढ्याच लांबीच्या दाढीमिशीच्या केसांचें पांढुरकें वलय होतें. ह्याच मूर्तींत आपला देव दिसे भोळ्या शेतकऱ्यांना. बूवांचा उजवा हात नामोच्चारागणीक डोक्यावर जाई. हाताच्या त्या इशारासरशी इतक्या जोमानें अन् उत्साहानें जनसमुदाय नामोच्चार करी कीं, त्यावेळीं पावलागणिक दोरांच्या

तोलांत पटाची जोडी ठेवणाऱ्या कुशल धुरकऱ्याची आठवण झाल्याखेरीज राहीचना. बूवाचा डावा हात नेहमीं गुंतलेला असे. काठीच्या आकाराची कुण्यातरी झाडाची एक खनपटलेली फांदी अन् फुटक्या काढाचें मातीचें गाडगें ह्या बूवाच्या अद्वितीय मोलाच्या वस्तूंची जपणूक करण्यांत सतत दंग असे त्यांचा डावा हात.

'विठ्ठल ! विठ्ठल ! विठ्ठल ! विठ्ठल !' नामोच्चाराची गति वाढली.......

बूवांनीं दोन्हीं हात वर केले.

नामगजर थांबला.

जादूची कांडी फिरविल्यासारखें सारें सामसूम झालें.

'माह्या माय बापहो ! त्या ईठ्ठलाचं नांव घ्या ! अरे संसाराचं आपलं त रोजचंच हाये ! तेल हाये त मीठ नाई अन् भाकर हाये त कोळ्ल्यास नाई ! ते त आपल्या जल्मालेच धुरलं ! पन इठ्ठलाचं नांव मातर इसरूं नोका ! इठ्ठल सर्व्याईचा हाये ! सखू मावली काय म्हनते पाहा—

इठ्ठल माहा सखा ग ऽ ओव्या मी गाईन।
राऊळासी जाईन मी तयासी पाहीन ॥

बोला : विठ्ठल ! विठ्ठल ! विठ्ठल ! विठ्ठल ! हो ऽ ऽ ऽ !

'माह्या माय बापहो ! तुकोबा म्हनतात—

'मळमूत्रीं जन्मला योनीद्वारें आला।
ब्राह्मण का जन्मला काना वाटे ? ॥'

'सारे एकाच ठिकानाहून आले अन् सर्व्याईले एकाच ठिकानी जावं लागते. अवघ्याईचा बाप तोच एक देव हाये. कोनी लहान नाहीं अन् कोनी मोठा नाहीं. त्याले अवघे सारखे. तो असं कहीच म्हनत नाहीं, कि हा माहा अन् तो लोकाचा. सर्वे त्याचेच हायेत. म्हनून वाचेन इठ्ठलाचं नांव घ्या !—"

"विठ्ठल ! विठ्ठल ! विठ्ठल ! विठ्ठल !"

+ + +

दुसऱ्याच दिवशींची गोष्ट. रात्रीं आठाचा सुमार. त्याच बेलुरा गांवच्या, त्याच मारुतीच्या पारावर तोच गॅसबत्त्यांचा झगझगाट दिसत होता. पारावर एक टेबल होतें. काठीस लावलेलें एक भगवें निशाण टेबलाच्या एका पायाला बांधलेलें दिसे.

टेबलालगतच्या खुर्चीवर दक्षिणेकडे तोंड करून इटालियन कॅपधारी गृहस्थ बसलेले होते. टेबलाच्या उजव्या कडेजवळ उभा राहून एक वक्ता बोलत होता. त्याच्या डोक्यावर भगवी टोपी होती. त्याचा आवाज खण-खणीत होता, भाषा आवेशयुक्त होती आणि हातवारे पण तिला साजेसेच होते. पाराच्या दक्षिण बाजूस पंचवीसतीस कदमांवर तीनचार गॅसच्या बत्त्या एकमेकींपासून तीसचाळीस फूट अंतरावर ठेवल्या होत्या. श्रोतृवर्गापासून बऱ्याच पाठीमागें दिसत त्या. वक्ता बोलत होता—

"...माझ्या हिंदु बांधवहो! आपण संघटित झालें पाहिजे!......आपला धर्म सनातन आहे! ......आपली संस्कृति अनादिकालापासून चालत आली आहे!......हिंदु राष्ट्राचें, हिंदु धर्माचें, हिंदु संस्कृतीचें रक्षण करायला आपणच पुढें आलें पाहिजे......हिंदु राष्ट्रपति सावरकरांचा आदर्श पुढें ठेवून कार्य करणारे आजचे आपले अध्यक्ष श्री. बाताडे वकील पुढारी म्हणून तुमच्यांत आहेत. ...... हिंदु-राष्ट्र, हिंदु-धर्म, हिंदु-संस्कृति जिवंत राहावी असें जर तुम्हाला वाटत असेल, हिंदु-राष्ट्राचे हिंदु-धर्माचे अन् हिंदु-संस्कृतीचे शत्रू जे मुसलमान, त्यांचा निःपात व्हावा असें जर तुम्हाला वाटत असेल तर तुम्ही श्री. बाताडे वकीलांनाच आपलीं मतें द्या..." टाळ्यांचा कडकडाट झाला. वक्ता खालीं बसला.

\+ + +

तीच रात्र होती. अकराचा सुमार असावा. मठींत भजनी मंडळी आपल्या उद्योगांत दंग होती. नवीन अभंगाला सुरुवात होण्यापूर्वींचें वातावरण तें. पखवाज्या मृदंग लावण्यांत दंग होता. मधूनच तो मृदंगावर थाप मारून आवाज काढी. तंबोऱ्याच्या सुरांत सूर मिळविण्याचा त्याचा प्रयत्न चालू होता. 'अहो! झ्यांगोबूवा! रातचा बुवाचा अभंग म्हनाना!' भजऱ्यांपैकीं एक मध्येंच बोलला.

'हो ! हो ! झ्यांगोबुवा तोच म्हना ! फारच छान हाये लेक तो !' बसलेल्यापैकीं दुसऱ्यानें दुजोरा दिला.

झ्यांगोबूवांनीं सुरुवात केली—

" जातीचा ब्राह्मण वाहे अभिमान
   म्हणे मी उत्तम चारीवर्णीं ॥
क्रियाकर्मे करुनी म्हणे मी ब्राह्मण
   तरि कां ब्रह्मखुण कळली नाहीं ॥
मळ-मूत्रीं जन्मला, योनिद्वारें आला
   ब्राह्मण कां जन्मला कानावाटे ? ॥
तुकाम्हणे ब्रह्म जाणे तो ब्राह्मण
   इतरांसी ख्रूण काय सांगू ? ॥ "

झ्यांगो बुवाच्या अभंगास भजनी मण्डळी साथ देत होती. आपल्या हृदयांतीलच बोल जणूं तुकोबा आपल्या अभंगवाणींतून प्रकटवित आहे, असें वाटत होतें सर्वांना. अन् त्या भावनेच्या भरांत सर्व मण्डळी तल्लीन झाली होती त्या भजनांत !

# माझें 'राष्ट्रीय' स्वप्न ! : : :

कॉङ्ग्रेसविषयीं अत्यादर बाळगणारा मी अेक कॉङ्ग्रेसनिष्ठ मनुष्य आहे. रात्रन्दिवस कॉङ्ग्रेस, कॉङ्ग्रेस, कॉङ्ग्रेस हा अेकच ध्यास माझ्या मनांत चालू असायचा ! काल रात्रीं मी झोंपलों. रात्रीं ४ वाजण्याचा सुमारास मला अेक सुन्दर स्वप्न दिसलें. हें स्वप्न जरी 'स्वप्न' असलें तरी, स्वप्नांतून अलीकडे साक्षात्कारांची पैदास होअूं लागल्यामुळें, प्रत्यक्षांपेक्षांहि स्वप्नांचें महत्त्व वाढूं लागलें आहे ! अतएव, माझें स्वप्नहि एक महत्वाचें साक्षात्कारी सत्यस्वप्न असल्यामुळें, लोकविचारार्थ मी तें प्रसिद्ध करीत आहे ! त्याचा कांहीं उपयोग माझ्या देशबान्धवास झाला, तर मी कृतार्थ होअीन !

स्वप्नास सुरुवात झाली.

माझ्या गुणावगुणांची विशेष चर्चा व पर्वा न करतां; कॉङ्ग्रेसनें मला मिनिस्टर केलें ! मला केवढा आनन्द झाला म्हणून सांगूं मी तुम्हाला ! मीहि राष्ट्रोद्धारार्थ अनेक महत्कार्यें माझ्या मिनिस्ट्रींत करण्याचें ठरविलें. मी अविवाहित असल्यामुळें; पहिल्यानें मी 'खादीप्रसार' नांवाच्या दैनिकांत अेक जाहिरात दिली, व सक्रिय खादीभक्ति प्रकट करण्यासाठीं तीन स्पष्ट उल्लेख केला कीं,

"वधू पाहिजे"

"वधू **शुद्ध खादीची** असेल तरच पसन्त केली जाअील. वधूचें शिक्षण **खादीच्या शालागृहांत** झालेलें असावें. वधूचा फोटो; **खादीचेच कॅमेऱ्यानें** काढून पाठवावा. पत्रव्यवहार **खादीचे शाअीनें** व **खादीचेच कागदावर** करण्यांत यावा. पत्र पोंचविणारा **पोस्टमन् खादीचाच** असावा असा अिषारा, पोस्टखात्यास, त्या पाकिटावरच दिलेला असावा."

माझें दुर्दैव ! ही माझी खादीभक्ति फसली व या राष्ट्रोद्धारकार्यांत मला यश आलें नाहीं. मला पटलें कीं, हिन्दुस्थानचा उद्धार अजून लांब आहे !

अखेर, मला खादीची वधु न मिळाल्यामुळें, मी अविवाहित आयुष्य कण्ठून देशोद्धारार्थ ब्रह्मचर्यव्रतस्थ राहाण्याचें ठरविलें.

" ब्रह्मचर्य आणि जीवन "

हा ग्रन्थ मी वाचूं लागलों. पण...काय ? ग्रन्थास हात लावल्याबरोबर मला कळलें कीं, हा **ग्रन्थकार खादीचा** नसून लेदरचा आहे ! मी तत्काळ हातांतील ग्रन्थ फेंकून दिला व ओरडलों, "घात झाला ! चामडयाच्या मनुष्यावर बहिष्कार घालण्याची चळवळ आतां करणें भाग आहे ! निदान ग्रन्थकार तरी खादीचा असल्याशिवाय, त्याचा ग्रन्थ कोणीहि वाचतां कामा नये ! " माझ्या दिवाणगिरींतील ही दुसरी खादीभक्ति मी प्रकट केली. लोक म्हणूं लागले, हा दिवाण नसून दिवाणा गृहस्थ आहे. हाय ! मला पटलें कीं, माझ्या हिन्दुस्थानचा उद्धार अजून लांब आहे !

आतां माझ्या राष्ट्राचा उद्धार कसा होणार, याचा विचार नित्य डोळ्यांसमोर असल्यानें, माझे डोळे बिघडले. डोकेंहि बिघडलें. डोक्यावर **खादीची टोपी** घालतांच गुण आला; पण डोळ्यांकरितां

खादीचा चष्मा

मला कुठेंहि दुर्दैवानें मिळाला नाहीं.

' परदेशी खादीचा सुद्धां चालेल ' म्हणून मी सर्व कारखानदारांना सांगितलें, पण ' खादीचा चष्मा नसतोच मुळीं ' असें त्यांच्याकडून उत्तर मिळतांच मी सुस्कारा टाकला. मला पटलें, हाय अजून माझ्या हिंदुस्थानचा उद्धार बराच लांब आहे !

डोळ्यांचा व दातांचा संबन्ध जवळचा असल्यानें, माझे १।२ दांतहि पडले व कॉङ्ग्रेस न् खादीप्रचारार्थ व्याख्यानें देतांना दांतांतून वारा जाऊं लागला. मी ठरविलें, दांत बसविणेंच भाग आहे.

'खादीचे दांत पाहिजेत ! '

म्हणून मी 'खादी प्रसार' पत्रांत पुन्हां जाहिरात दिली. लोक हंसायला

लागले आणि म्हणायला लागले; "अरे, जाऊं द्या न! या खादीभक्तांचे खाण्याचे दांत निराळे न् दाखविण्याचे दांत निराळे असतात !"

मी स्वस्थच राहिलों ! अखेर माझी हीहि राष्ट्रभक्ति व खादीकार्य अयशस्वि झालें ! मला वाटलें, खरोखर माझ्या हिंदुस्थानचा उद्धार अजून किती लाम्ब आहे बरें !

मी हताश झालों. दमलों. हातांपायांत त्राण उरलें नाहीं. मी आतां मोटारींतून देशभक्ति करण्याचें निश्चित केलें; आणि स्कीम आंखूं लागलों तों काय ! सगळे बेटे मला हंसायला लागले नि म्हणायला लागले, " वा वा ! मिनिस्टर ! तुमच्याकरितां

**खादीची मोटार नि खादीचें पेट्रोल**

कुठून हो मिळणार ! ही तुमची कल्पना झूट आहे. मोटार आणि पेट्रोल पुरतें तरी तुम्ही विदेशीभक्त बनलेच पाहिजे. वाटल्यास **खादीचा हॉर्न** आम्हीं तुम्हांस देऊं. " असें म्हणून माझ्या असेम्ब्ली मेम्बर्सनीं

**खादीचा पोंगा माझ्या हातांत दिला !**

मी नुसत्या पोंग्याचें काय हो करणार ? मी, तो तिथेच ठेवला व सिद्धान्त ठरविला कीं, ही——

**खादी चळवळ अशक्य आहे !**

६ वाजतां जंगी जाहीरसभा भरवून तींमधून ह्या सर्व अडचणी जाहीर कराव्यात असें मला वाटलें. माझ्या घड्याळाकडे पाहाण्याकरितां मी हात वर केला, पण हाय ! किती वाजले म्हणून पाहायचें तर **घड्याळाची कांच व कांटे हीं सुद्धां खादीचीं नाहींत !**

स्वप्नांतील माझ्या दैहिक चळवळींचें अन् मौखिक बडबडीचें पूर्ण निरीक्षण केल्यामुळें कीं काय न कळे; माझ्या लाडक्या 'हि' नें घाईघाईनें एका हातानें हालवून मला जागे करीत टोमणा मारला—

" अहो मिनिस्टरसाहेब ! हें स्वप्न आहे ! "

आतां या स्वप्नांतून जागे व्हा, अन् चहाची वेळ होत आली आहे; चहा घ्या प्रथम ! पण **खादीचा चहा** नाहीं हो ! **अन् कपबशी पण खादीची** नाहींत आपल्या घरांत ! "

मी जागा झालों; व पहातों तों काय—?

मिनिस्ट्री नाहीं, देशोद्धार नाहीं, स्वराज्य नाहीं, स्वातन्त्र्य नाहीं, खादी-भक्ति नाहीं, कांहीं नाहीं ! ब्रिटिशमेकूच्या सुन्दरशा गोल्डन ट्रे मधून माझे समोर फक्त गरम गरम चहा व हण्टलेपामरचीं बिस्किटें मला दिसूं लागलीं !

आमचा अरू म्हणाला, " बाबा ! मला कीं नाहीं विलायती फटाकडे आणा हो ऽ !

माझी कुसुम म्हणाली, " बाबा तें मॅन्चेस्टरचेंच जाकिट मला हवं ऽ !' आणि पत्नि तर काय, गाल फुगवित फुगवित फणफणली, " माझ्याकरितां आज वेस्टर्नसायरप आणायचं ना ? " अेवढयांतच मला माझें स्वप्न आठवलें न् मी खूप खूप हंसलों !

मला वाटलें, माझ्या स्वप्नांत कांहीं सत्य साक्षात्कार तर नसेल !



# इज्जत ! : : : :

...' धनी, नांव घेना !' ओणव्यानेंच पण डाव्या खांद्यावरून मागें पाहात सखीनें सुरुवात केली.

' सखी तेलीन !'

' चाला !' मानेला झटका देऊन दोन बोंडें न घेतांच सखू पुढें गेली.

साऱ्या शेतांत हंशा पिकला. वाऱ्याच्या लाटेसरशी पऱ्हाटी सळसळली. नव्हे, सर्वच हंसतातसें पाहून ती पण त्यांत सामील झाली !

कापसाचा हंगाम होता तो. दगडाप्पा शेट्याच्या वावरांत होत्या त्या बाया. दिवाणजी तर रोजच असत बायांबरोबर; पण आज त्यांच्याबरोबर बसाप्पा देखील होता. दगडाप्पा पंचवीस कोसांतले प्रसिद्ध सावकार. बसाप्पा हा दगडाप्पाचा थोरला मुलगा. चरणगांवची सारी इस्टेट बसाप्पाच्या सुपूर्द करायचें दगडाप्पाचें ठरल्यासारखेंच होतें. लहाने धनी आल्यानें सर्वांनाच आनंद वाटत होता. बायांची अर्धीअधिक पाथ झाली होती. दिवाणजी आणि बसाप्पा त्यांचे मागोमाग चालत होते. सर्वत्र सामसूम होतें. सखू अन् बसाप्पा यांच्यामधील संवादानें सगळें वातावरण मोकळें झालें. सर्वांचा संकोच दूर झाला. सखू तेलीण वयस्कर बाई, तिनें बसाप्पाला अंगा-खांद्यावर खेळविलेलें. दिपू तेल्यास बसाप्पा दादा म्हणे, आणि तेंच नातें लांबवून सखूस ' भाबी ' म्हणे.

बाया कापूस वेंचीत होत्या. काम करतांना कुणी गोष्ट सांगत होती, तर कुणी गाणें गुणगुणत होती. मधेंच एखादी थांबे, कंबर सरळ करे अन् मागें उलटून पाही. कुणाच्या नजरचुकीनें कांहीं बोंडें राहिल्यास तिला इशारा देऊन परत कामाला लागे. सर्वांना सांवरून घेण्यासाठीं बायजाई सदाच साऱ्यांच्या मागें असे. कधीं कधीं तिच्यापण इशाऱ्याची एखादीस जरूर पडे, पण तसें क्वचितच होई.

‘ बायजाई, खालचं बोंडबांड घ्या बरं ! मी जातो ! ’

‘ तुमी कानी बिनघोर जा दिवानजी ! ’ सारी जबाबदारी बायजाईवर टाकून दिवाणजी दुसऱ्या वावरांत निघून गेले. बल्लाप्पादेखील त्यांच्याच मागोमाग गेल्याचें बायांनीं बघितलें.

÷ + +

मेरीवर गेल्या कीं, दोघीदोघी, तिघीतिघी. बसत. लुगड्याच्या घोळांतून आपापल्या चंच्या काढीत. प्रथम, सुपारीचे चिंचोक्यायेवढें खांड तोंडांत टाकीत. नंतर पानाचा पैशाएवढा तुकडा तोडीत, त्याला डाळिंबी एवढा चुना लावीत अन् त्याचा चोळामोळा करून दाढेखालीं घालीत. नखानें काथ फोडून खात. शिलकी काथाचा खडा चंचीच्या पहिल्या पुडांत ठेवून थोडें थांबत. नतर शेवटल्या पुडांतली तंबाखू दोन बोटांच्या चिमटींत घेत. किंचित् आभाळाकडे पाहिल्यासारखें करीत; आ करून तोंडांतील पानाच्या बरोबर लगद्यावर ती तंबाखूची चिमूट सोडीत. चंची गुंडाळून पुन्हां घोळांत घातली कीं बसल्या परत पाथीवर.

एखादा तुंगा चुकारांचा असे. त्याला बायजाईच्या इशाऱ्याचीच मात्रा लागू पडे. •

बायांच्या पाठीवर कापसानें फुगलेले वटे होते. लांबून पहाणारांस ओणव्यानें कापूस वेचणाऱ्या बाया दिसतच नसत. पाण्यांत मान बुडवून किडे शोधीत पुढें पुढें चालणारीं बदकेंच दिसत जणू तीं.

मधेंच कुणी एखादी आंब्याखालीं पाणी प्यायला जाई. पण ती तांतडीनें परते. आपली पाथ इतरांच्या मागें पडूं नये हीच प्रत्येकीची इच्छा. हा क्रम दुपारीं अडीचतीनपर्यंत चाले. नंतर दुपारच्या न्याहारीचा वखत होई. साऱ्या, आंब्याखालीं येऊन शिदोऱ्या सोडून बसत. मात्र त्यांच्या आतांपर्यंतच्या सामुदाइक व समानतेच्या जीवनांत येथें खड पडे. एका जातीच्या तेवढ्या एकत्र बसत; बाकीच्या अंतरावर असत. हिंदुसमाजाच्या जातीभेदासारख्या हीनगंडानें येथपर्यंत प्रवेश केलेला पाहून सखेदाश्चर्य वाटे. वीस–पंचवीस बायांचाच तो छोटा समाज ! पण हिंदुस्थानचें सारें वातावरणच जातिभेदमय झाल्या-

कारणानें, त्या छोट्याशा समाजांतदेखील एकमेकांकडे पाठफिरवून बसणारे जीव होतेच. ह्याचवेळीं लेकूरवाळया आपापल्या तान्हुल्यांना पाजीत. आंब्याच्या डांगांना बांधलेल्या धोतरांच्या झोळया असत. मुलांचें पिऊन झालें कीं, त्यास झोळींत टाकून आई थोडें हालवी. रानच्या मोकळ्या वाऱ्यांत मूल ताबडतोब झोपीं जाई.

\+ + +

' गंगे, काय घेतलं व घोयांत ?'

'कुठी ? काइनाइ बा जी !'

' चोट्टे !...टाक खाली ! हे का तुह्या काकाच हाये ?'

बसाप्पानें गंगीच्या घोळाला झटका दिला. झटक्यासरशी घोळ सुटला. मूठभर तुरीच्या शेंगा, दोन वाळकें अन् चार-पांच भेंड्या एवढा सरंजाम जमीनीवर पडला.

दुसऱ्या वावरांतून फेरफटका करून बसाप्पा एकटाच परत आला होता. भरलेला वटा रिकामा करायला गंगू एकटीच आंब्याखालीं गेली, आणि त्याचवेळीं देखरेखीचें काम चोखपणें बजावल्याचें समाधान बसाप्पानें वरीलप्रमाणें स्वतःच्या पदरीं पाडलें! नंतर तो निघून गेला.

गंगू जरा उशीरानेंच पाथीवर आली. सोबतीणी दहापांच पावलें पुढें निघून गेल्या होत्या. गंगूनं वटा केला. इतरांसारखीच तीपण ओणव्यानें कापूस वेंचू लागली. जेवणापूर्वी गाण्याचें पुढारीपण तिजकडे होतें. आतां तिच्या तोंडून ब्रह्म निघेना. डोळे सारखे भरून येत. जमीनीवर टिपें पडत. पण झालेला प्रकार इतरांना सांगण्याची सोय नव्हती. गोष्ट कानोकान जाईल, घराण्याची इज्जत जाईल. म्हणून तिची शांती ढळलेली होती. गंगूतील बदल तिच्या सखींच्या ध्यानांत यायला वेळ लागला नाहीं. या ना त्या निमित्तानें त्या सर्वजणींनीं गंगूवर घसरण्यास सुरुवात केली. गंगू कुणासच दाद देत नाहीं आणि सारखी गुपचुपच आहे असें पाहून एकीनें तर ' गंगाई पावगे भले, रोडगा वाहीन तुले ' म्हणायला सुरुवात केली. त्याचादेखील उपयोग झाला नाहीं तेव्हां मात्र बायजाईनें गंगूजवळ येऊन सरळ चंचीच सोडली. तिला

पाहतांच गंगूचे डोळे गरकन् भरून आले; पण गंगूनें तावडतोब तोंड फिरवून लुगड्याच्या पदरानें ते पुसून काढले. कांहींच झालें नाहीं असें दाखवीत गंगू बसली.

‘ का व पोरी ! काहून दडतं अशी ? ’

‘ मले कानी भोंडच आल्यासारखी वाटते.’

‘ ऊन लागलं तुले ! बस जाय आंब्याखालीं ! मी घेतो तुही पाथ ! ’

बसाप्पा केव्हांच निघून गेला होता. गंगू खरोखरच परतली. आंब्याखालीं येऊन तिनें वटा सोडला. कापसाच्या ढिगांत तोंड खुपसून फुंडूफुंडू रडली ती. बाया त्या मेरीवर गेल्या. गंगूचा उसमडा कमी झाला. ती परत कामाला लागली. तिचा चेहरा निश्चयी दिसला.

× × × ×

“ चाट्याभाट्याईले कुठली रीतभात माय ! आतां, लेकरवाईनं मूठभर सेंगा अन् चार वायकं घेतले त काय झालं ! काल मले तुयसींग पाटलाचा होका होता. टोपलं टोपलं बरबटीच्या सेंगा देल्या अवध्याजनीले त्याहीनं. पाटील तो पाटीलच ! पन हें पळ्ल चाट्याभाट्याईचं काम ! टचटच लळ्ली गंगी दिसभर ! ”......

झाकट पडत होती. बाया लगबगीनें गांवाकडे येत होत्या. गंगूच्या सोबतीणीपैकीं एक बाई रस्त्यानें बोलत होती. मोठ्या उत्कंठेनें तिला भेटलेल्या दुसऱ्या बायां ऐकत होत्या.

× × × ×

‘ बायजाई, सकाय बळ्लाच्या वावरांत पंचीस बाया बरं ! ’ दगडाप्पांच्या दिवाणजीनें बायजाईच्या दाराशीं येऊन नेहमीं प्रमाणेंच मोठ्यानें ओरडून सांगितलें.

‘ म्या होका घेतलाय, दिवानजी ! ’

बायजाईचें घरांतूनच उत्तर आलें. तिचा नेहमींचा मोकळेपणा तिच्या उत्तरांत आज नव्हता. तिच्या त्या तुटकपणामुळें दिवाणजीलाही जरा निराळेंच वाटलें.

'काय झालं बायजाई ?'

'काय होईल बापा ? गरीबाईच्या लेकीबाई, धनवानाच्या लेकीसुनावानीं कुठी असतात ? त्याहीले कुठली अब्रू न् इज्जत ?'

दिवाणजी चरकला. त्याच्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडला. त्याला सारें कांहीं अगोदरच कळले होते. पण करतो काय ? अन्नाचा मारलेला बिचारा !

दिवाणजी निघून गेला. त्याची पाठ फिरते न फिरते तोच तुळशीग घाटलाचा गडी बायजाईशीं पस्तीस बायांची हो–बोली करून गेला.



# जीवन ! : : : :

रविराजाच्या आगमनाचा कानोसा लागल्यामुळें उषेच्या गालांवर नाजुक रक्तिमा थुइथुइ नाचूं लागली होती; सूर्यदेवाच्या स्वागतार्थ खडापहारा देत, शुक्र स्वस्थ उभा होता; आकाशभर चन्देरी बिछाइत पसरून चन्द्र नुकताच स्वगृहीं गेला होता; अन् अरुण आपले घोडे खूप वेगानें उधळीत पूर्वेजवळ-जवळ येऊन भिडला होता.

पृथ्वि कांहींशीं झोपेंत अन् कांहींशीं जागृतींत होती त्यावेळीं. भूलोकावर सैतानांचा अम्मल अजून सुरूं झालेला नसल्यानें-जिकडे तिकडे गंभीर दैवी-वातावरण प्रसृत झालेलें होतें. असल्या पावित्र्यगर्भ अन् नितान्त प्रशान्त-समयीं; प्रभूपूर शहरांतील दत्ताच्या मंदिरांत, सुस्वर आवाजांत न् मनोवेधक आळवणीनें कोणीतरी भूपाळी गात होते.

" जागो रे ऽ ऽ रघुना ऽ ऽ थ कुँवर पन्छी बन बो ऽ ऽ लेऽ ऽ "

तो गायक ही भूपाळी निरनिराळ्या रागांत अन् नवनव्या धाटणीनें आलटून पालटून घोळून घोळून आळविण्यांत अगदीं तल्लीन झालेला होता. सामान्य मनुष्यांना खुष करण्याकरितां त्यांच्या समोर गायनास बसलेल्या गाय-कास जर आपल्या गायनकसबाची अगदीं कमाल करून दाखवावी लागते; तर प्रभुला आळविण्यासाठीं चङ्ग बांधल्यावर, आपलें चातुर्यसर्वस्व त्यांत ओतणें अगदीं क्रमप्राप्त आहे असाच त्रैराशिकी सिद्धान्त योजिला होता जणू त्या गायकानें ती भूपाळी गाण्याचेवेळीं ! गायकानें कसल्याहि वाद्याची साथ घेतली नव्हती ही भूपाळी गातांना. प्रभुध्यासाच्या तारेंत त्यानें आपला कंपित मधुर सूर समरस करून घेतलेला होता आणि आत्मानन्दाचा ताल आपोआपच त्याच्या सुरावटीची सुन्दर साथ करीत होता. समाधीसुखाचाच सोहळा भोगीत होता जणू तो गायक.

अंगांत, बंगाली सदऱ्याच्या पद्धतीचा ढिला लांब सदरा; अन् बंगाली

पद्धतिचेंच सोगा सोडलेले नेसू धोतर एवढाच त्या गायकाच्या पोषाखाचा व्याप होता. विशाल वैभव नि अगडबम्ब ऐश्वर्य यांच्यावर पूर्ण बहिष्कार पुकारला होता जणूं त्यानें. तरीपण एके काळीं खूप वैभव भोगलेली ही व्यक्ति असावी असें मात्र कोणलाहि त्याचेकडे पाहतांच मनोमन पटेल, असें एक आकर्षण होतें त्याच्या व्यक्तिमत्वांत. जुन्या किल्ल्याचें, गडांचे, राजवाड्यांचे, महालांचे, अवशेष पाहत असतांना आपल्या डोळ्यांसमोर जसें त्यांचें पूर्ववैभव मनोमन उभें राहतें; त्याचप्रमाणें होई ह्या गायकाकडे पाहतांना.

अलीकडे बरेच दिवसांपासून, त्या देवालयांत 'जागो जागोरे ऽ' ही भूपाळी गोड गोड आलापात निनादली जात होती, अन् त्या देवालयाचे पुजाऱ्यानें तर ह्या गोड भूपाळीची व तिच्या गायकाची प्रभुपुरांत चांगलीच जाहिरात केलेली होती. अगदीं जीवाभावापासून तो पुजारी सांगायचा लोकांना कीं,

"खरोखरच, या प्रभूपूरचे लोक किती अभागी म्हणून सांगूं! आंधळ्याच्या घरीं दृष्टि आपणहून चालत आली असूनहि तिच्यापासून दूर दूर पळणारे हे प्रभुपूरचे आंधळे, दुर्भागीच नव्हत तर काय! कुठून तरी बिचारा एक मुशाफर येऊन आमच्या देवळांत उतरला आहे अलीकडे. तरुण आहे; सज्जन आहे; खूप विद्वान् आहे. कित्येक सुंदर सुंदर स्तवनें स्वतःच तयार करून गातो तो आमच्या मंदिरांत. त्याच्या एकंदर धाटणीवरून, चांगल्या ऐश्वर्यांत अन् विलासात वाढलेला असावा तो, असेंहि अगदीं स्पष्टच दिसतें. अन् स्वभाव किती गोड! त्याच्या सहवासाशिवाय मला तर अगदीं करमेनासें झालें आहे अलीकडे. तो येण्यापूर्वीं या देवळांत देव होता; पण आतां त्यांत जीवन आलेलें आहे असें वाटतें मला; आणि काय विचित्र योगायोग पहा; त्या मुशाफराचें नांवहि जीवनच आहे. खरोखर बिचाऱ्याचें आईबाप धन्य होत कीं, ज्यांनीं आपल्या या जीवनांत इतर निर्जीव ठिकाणीं 'जीवन' भरण्याची अद्भुत करामत निर्माण केली. आमच्या जीवनची सकाळची भूपाळी म्हणजे तर काय; मूर्तिमंत भक्तिरसाचा अव्वल-दर्जाचा नमुनाच

अगदीं. बिचारा आणखी बरेंच दिवस मुक्कामास राहो म्हणजे आनदांची लखलूटच जणूं ! ”

दत्तमन्दिराच्या पुजाऱ्यानें केलेलें हें वर्णन, कांहीं उथळया शिष्टांना ‘ जाहिरातवजा ’ वाटे, तर कित्येकजणांना त्याची प्रतीति पाहण्याचाहि मोह अनावर होई.

× × × ×

नित्याप्रमाणे आजहि त्या पवित्र वातावरणांत, जीवनच्या भूपाळीचे मधुर सूर, जीवन ओतीत होते—

जागोऽऽ जाऽगोऽरे रघुनाऽऽथ कुँवर पन्छी बन बोऽऽलेऽऽ ।

देवळांतील पुजारी डोळे मिटून, नादमुग्ध सापाप्रमाणें गुंग होऊन डोलत होता. त्याला न कळतच त्याची डोलण्याची क्रिया घडत होती !

मन्दिरांतील देवमूर्ति तर जणूं जीवनच्या प्रत्येक सुरासुरासरशीं त्याच्यावर प्रसन्न होऊन त्याला इच्छित वर देण्यास उत्सुक झालेली आहे असेंच वाटे न्हाणारास.

अन् स्वतः जीवन ? तो तर तन्मयच झाला होता अगदीं.

**“ शान्त-शान्तशी प्रशान्त देवमूर्ति पाहुनी—**
**दिव्य दीप्ति फांकल्या मनांत दीप्त होउनी !**
**भव्य भव-भावना भङ्गल्या भासल्या**
**भव-विभव-वासना सर्वही नासल्या**
**दिव्य-पद-दर्शना वृत्ति धाधावल्या**
**चित्कला चिन्तनीं चिन्मया जाहल्या ! ”**

हें दुसरं एक गीत कर्णमधुर रागदारींत गोड आवाजानें गाऊन जीवननें आपलें गायन थांबविलें.

पुजाऱ्यानें हळूंच डोळे उघडून एक दीर्घ निःश्वास सोडला. जीवन आपले डोळे उघडून स्वस्थपणें तेथेंच बसला. त्याच्या चेहऱ्यावर कृतज्ञता आणि कृतार्थता या दोन्हीं भावनांच्या गंभीर छटा स्पष्ट स्पष्ट दिसत होत्या.

मन्दिराचे प्रवेशद्वाराशीं यापूर्वीच एक भारी किंमतीची मोटार येऊन उभी राहिली होती. तींत एक सुखवस्तु जोडपें बसलेलें होतें.

" छेऽगऽ ! तुझा जीवन वेगळा न् हा बिचारा वेगळा !

तुझा जीवन इथें कशाला येईल ? ' जागो जागो रे रघुनाथ कुँवर ' हें गीत, तुझ्या जीवनचें आवडतें गीत म्हणून तुला तसा भलताच संशय आला; व नांवहि जुळल्यामुळें त्या संशयाला अधिकच निश्चिती आली. त्या पुजाऱ्यानें सांगितल्यापासून तूं उगीचंच आपली वेड्यासारखी करायला लागलीस ? भलतेंच खूळ घेऊन बसलीस कृपे तूं डोक्यांत ! चला जाऊं या परत आपण; वेड्यांत काढायचें कुणी आपणाला !"

शेजारच्याच सिट्वर बसलेल्या आपल्या कृपेकडे बघून, पूर्णचन्द्र अगदीं आग्रहीवाणीनें सांगत होते तिला.

" पण आवाजसुद्धां अगदीं तस्साच वाटतो मला चन्द्र ! लकब तर अगदीं हूबेहुब माझ्या जीवनाचीच ! आपण आंत जाऊनच बघूं या चन्द्र !" पूर्णचन्द्राच्या पुढील बोलण्याची वाट न पाहतां, गाडींतून खालीं उतरत असतांनाच कृपा उद्गारली.

अगदींच वेडी ग ऽ तूं ! " कृपेच्या मागोमागच मोटारींतून खालीं उतरतांना पूर्णचन्द्र म्हणाले.

कृपा व पूर्णचन्द्र मंदिरांत जातांच, पुजाऱ्यानें त्यांचें स्वागत केलें.

" आज ही लक्ष्मीनारायणाची फेरी कशी काय घडली माझ्या अभाग्याकडे !" हात जोडून कृतज्ञबुद्धीनें पुजारी म्हणाले.

" काय हो पुजारी महाराज ! त्या दिवशीं आमच्या घरीं यांच्याजवळ तुम्ही सांगत होते, तेच गृहस्थ ना आतां गात होते ते ? जीवन ना तुम्ही सांगितलंत त्यांचं नांव ? इथें कुठे दिसत नाहींत ते ? आतांच थोडया वेळांपूर्वी गात होते ना आंत ?" घाईघाईनें व आतुरतेनें कृपा बोलत होती.

" होय मातुश्री ! तेच माझे जीवन ! आत्तांच क्षणापूर्वी मागल्या दरवाजांतून ते बाहेर निघून गेले. प्रातःस्मरण आटोपलें कीं,लगेच ते कुठेंतरी बाहेर जातात.

लहर लागली तर लवकरच परततात, नाहींतर मग रात्रसुद्धां होते कधीं कधीं त्यांना परत येण्यास! आनंद त्यांच्याबरोबरच असल्यामुळें, ते जिथें रमतील तेथें आनंदमय वातावरण निर्माण होतें कृपाताई!" बोलतांना, पुजाऱ्याचे चर्येवर निरतिशय आनंद दिसत होता व उत्साह तर अनन्यच!

पूर्णचंद्रानीं पुजाऱ्याच्या बोलण्यास टोमणा मारला,—"असेच भटके शंख दिसतात कुणीतरी!"

पुजाऱ्याचा चेहरा खर्रकन् उतरला हें वाक्य ऐकतांक्षणींच. कृपेलाही हें वाक्य आवडलें नाहीं.

"चंद्र! तुमच्या बोलण्याला कांहीं नियमच नसतो गडे कधीं! उगीचच कुणालाहि कशास बोलावें असें लागण्यासारखें!"

"नुसत्या आत्मीयतेच्या आभासाची तुला इतकी बाधा झाली आहे कृपा? अग, हा शंख म्हणजे तुझा शंख नव्हे! तुला अशानें वेड्याचे हॉस्पिटल्मध्यें नेऊन पोंचवीन मी एखादे वेळीं!" विनोद आणि आश्चर्य प्रकटवित पूर्णचन्द्र उद्‌गारले.

"इश्श!"

कृपा आपलें व्यवधान पुजाऱ्याकडे देत बोलूं लागली,—"आतां किनी पुजारी महाराज! तुमचे जीवन परत आल्यावर त्यांना; तुम्ही कोण? असें कां भटकतां? कां म्हणून असा उद्वेग आला तुम्हाला? अशी माहिती विचारून, आम्हाला कळवाल तर फार आभारी होऊं आम्ही तुमचे!"

पूर्णचन्द्र कृपेला आणखी चिडविण्याकरितां कृपेच्या बोलण्यास साथ देत हंसत हंसत म्हणाले, "जरूर कळवाल ना पुजारी महाराज! मग आमची कृपा एक ग्रंथ लिहिणार आहे त्या माहितीच्या आधारें!"

"कृपाच तूं! जिकडे वळली तिकडे वळलीस!" मिस्किलपणें कृपेकडे बघून, थट्टेच्या हावभावानें पूर्णचन्द्र उद्‌गारले.

"इश्श!" किंचित् अस्पष्टसाच शब्द निघाला कृपेच्या तोंडून.

कृपा व पूर्णचन्द्राना पोंचविण्याकरितां, मोटारीपर्यंत पुजारीमहाराज त्यांचे बरोबर गेले. मोटारींत बसल्यावर दोघांनींहि पुजारीमहाराजांस नमस्कार केला.

" अगदीं जरूर विचाराल ना पुजारी महाराज ? " कृपेचा आवाज, व मोटारच्या हॉर्नचा आवाज एकच झाला !

× × × ×

" तुमच्या आतांपर्यंतच्या सहवासाचा माझे मनावर इतका अनुकूल परिणाम झालेला आहे बाबासाहेब; कीं तुमचा आग्रह मला मोडतां मोडवत नाहीं. माझें तोंडून ' नाहीं ' असा शब्द, तुमच्यासाठीं निघणें शक्यच नाहीं. माझें मन व हृदय तुमच्या अहेतुक परोपकारी वृत्तीनें भारलीं गेलीं आहेत. मी कृतघ्न कसा होऊं शकेन ? पण बाबा ! मला एक छोटीशी भीक घालाल ? माझी लहानशी याचना पूर्ण कराल ? क्षमा करा माझ्या या साहसाची मला ! माझी ही कैफियत कृपा करून तुमच्यापुरतीच ठेवा. तुमच्याच हृदयांत तिला कोंडून ठेवा ! एवढीच माझी इच्छा आहे."

" नाहीं सांगणार जीवनबाबू मी कोणाला ! तुमच्याच गळ्याची शपथ ! आतां तर झालें ना ! " जीवनच्या गळ्यांवर आपला उजवा हात ठेवीत निश्चयात्मक स्वरांत गदगदलेल्या कंठानें पुजारी म्हणाले.

" ही आग नेहमीं अशी आंतल्या आंतच पेटत ठेवण्याची संवय झालेली आहे बाबासाहेब मनाला ! जरासुद्धां तिचा धूर जरी बाहेर निघाला, तरी सगळें आसमन्त कोंडाळून जाईल असा धाक वाटतो जीवाला अगदीं !" जीवनच्या डोळ्यांतून त्याला नकळत दोन अश्रु ओघळून गेले !

" अगदीं खरं बोललांत बाबूजी !" पुजारी महाराजांचें हें वाक्य जीवनच्या डोळ्यांतील अश्रूंत विरून गेल्यानें त्याचें प्रत्युत्तर जीवनकडून मिळालें नाहीं !

जीवननें आपले अश्रु पुसून बोलण्यास सुरुवात केली—

" माझें आत्तांपर्यन्तचें आयुष्य म्हणजे, जीवनाचे प्रयोग करून पाहण्याची एक प्रयोगशालाच करून ठेवली आहे मी बाबासाहेब ! अगरबत्तीचें जीवन,

जीवननें यावच्छक्य डोळ्यांसमोर ठेवलेलें आहे; म्हणूनच स्वतः जळून राख होत असतांहि, आसमन्तांत फैलावणाऱ्या सुगन्धाच्या मोहानें धुंद होऊन अधिकाधिक जळण्यांतच एकप्रकारचें विशिष्ट समाधान वाटतें जीवाला. अनेकांच्या जीवनांचा उपयोग आपल्या जीवनाच्या शोभेसाठीं करून घेऊन, त्या पराक्रमानेंच फुगून जाण्याची जी जीवनाची रूढी आहे; तिचा पूर्ण वीट आला आहे अगदीं प्रथमपासून माझ्या मनाला. अन् म्हणूनच, जीवनाची माझी व्याख्या, वेडगळपणाची वाटते कित्येक जीवन-शिकन्दरांना ! माझ्या या उफराट्या बुद्धिबद्दल,माझ्या प्रामाणिक हितचिन्तकांनाहि खेद वाटतो कित्येकदां; अन् ते हळहळतातहि या प्रकाराबद्दल. पण त्याबद्दलहि, हार्दिक खेद मानण्याहून अधिक मी कांहीं करूं शकलों नाहीं आतांपर्यन्त !

मी जर तुमच्यासारखा सडा सुभागी असतो बाबासाहेब ! तर जीवनावरील नकली मुलामे खरडून खरडून काढण्यांतच आयुष्याचा प्रत्येक क्षण खर्ची पाडला असता मी ! जीवनाचे जे निरनिराळे नमुने आतांपर्यंत माझ्या पाहण्यांत आलेले आहेत; त्यांची किळसवाणी शिसारी अंगास झडल्या आणल्याखेरीज राहात नाहीं ! ”

जीवनच्या अंगावर रोमांच उभे राहिले होते हें बोलत असतांना.

एक प्रदीर्घ निश्वास सोडून, जीवननें पुढें बोलण्यास सुरुवात केली. पुजारीमहाराज त्याच्या डोळ्यांशीं डोळा भिडवून उत्सुकतेनें ऐकत होते.

—“ आपण विचारलेल्या हकीकतीचे मुळाशींहि असाच एक जीवनाचा नमुना कारणीभूत आहे बाबासाहेब ! तुमच्या या प्रभुपूरांतच, संभावितपणाचे अन् बडेपणाचे नकली मुलाम्यानें चमचम् चमकणारें एक बडें प्रस्थ आहे ! त्याचें नांव पूर्णचंद्र, तुम्हांस ऐकून तरी माहिती असेलच कदाचित् हें नांव. आंग्लविद्याविभूषित; पुष्कळ दिवस उच्च अधिकारांवर सरकारी कृपाछत्राखालीं अधिष्ठित झालेलें; अन् हजार बदकर्में करून बरीच माया जवळ जमविल्यामुळें अनेक हांजीहांजीखोर लाळघोट्या भाटांच्या स्तुतीस पात्र झालेलें; असें हें धेण्ड तुमच्या प्रभुपूरांत प्रतिष्ठितपणें नांदत आहे ! तुम्हालाहि कदाचित् त्या प्रतिष्ठेचा वचक वटत असेल, जर तुम्हाला त्या धेण्डाची ओळख असेल तर. क्षमा करा मला, माझें स्पष्ट बोलणें आपणांस न रुचल्यास !

"या पूर्णचंद्रानें; या उच्च–शिक्षण सम्पन्न, सत्ताधारी, बडेजावी, प्रतिष्ठित बेण्डानें; आत्तांपर्यंत आपल्या पाशवी वासनेच्या खाईत, कितीतरी निष्कपट अन् दैवी-गुणमण्डित देवतांचीं प्रेतें पुरलेलीं आहेत ! एकापेक्षां एक आदर्श श्रेष्ठ-गुणांच्या आणि रूपसौन्दर्यसंपन्न अशा चार बायका; अमानुषपणाचा कळस करून या नादान माणसानें सोडून दिलेल्या आहेत ! एकीमागून एकीशीं लग्न करून तिच्या नवनवोन्मेषशालि यौवनाची होळी केली कीं, याच्या पतित्वाची धार्मिक अन् व्यावहारीक जबाबदारी संपली ! तिच्या पुढील जीवनाचीहि जबाबदारी यानें कधीं चिंतिली नाहीं ! मग हें गिधाड पुन्हां दुसरी शिकार गांठण्यांत धुंद !

"बाजारांतील दीडदमडीचा सौदाहि एकदां खिशांत घालून चार पावलें परतल्यावर, पुन्हां केवळ लहरीखातर 'मला हा नको' म्हटल्यास, थोबाड फुटल्याशिवाय राहात नाहीं ! अन् हा तर सबन्ध जीवनाचा प्रश्न आहे ! अशी चार लग्नें केलींत या दानवी–मानवानें एका मागून एक; अन् अनुक्रमानें प्रत्येकीचा बलि आपल्या आसुरी वासनेला अर्पण करून, पुन्हां हा नरराक्षस पुढील आहुतीसाठीं ऑ फाडून तयारच आहे ! त्या थोर देवता अन् हा अघोर राक्षस ! त्यांचीं निष्पाप जीवनें भडाडण्यास कारण काय, तर केवळ याच्या बेलगाम दुष्ट वासनेचा सवचाल हावरेपणा ! याच्या अनिर्बन्ध वासनेच्या लाटा, सारख्या अशाच उफाळत राहणार व त्या असल्या अनेक जीवांची आहुति घेणार हें मानसशास्त्रीय अबाधित सत्य त्या भावड्या जीवांस कसें कळणार ! अन् पुन्हां या भीषण पापांवर दाट पांघरूण घालण्यासाठीं लागणारा पैसा, भरपूर प्रमाणांत जवळ असल्यावर; असल्या अमानुष बदकर्मांचें लायसेन्सच असायचें जणूं खिशांत !"

जीवनाच्या तोंडून प्रत्येक अक्षर असें निघत होतें कीं, जणूं लालभडक तापलेल्या लोहावर घणाचे दणके बसतांना सन् सन् सन् ठिणग्या वर झिरंगताहेत !

पुजारी विस्मयमुग्ध मुद्रेनें जीवनकडे बघत, तन्मयतेनें ऐकत होता प्रत्येक शब्दन् शब्द.

"सध्यां या पूर्णचन्द्राची लग्नाची पत्नि म्हणून जी सद्गुणी पण दुर्दैवी

तरुणी, मानसिक दुःखाच्या आगींत होरपळून निवत आहे; तिचें नांव कृपा. नांवासारखीच आदर्श मुलगी ती. असल्या राक्षसानें तिच्या पायाचें तीर्थ जर रोज प्रातःकाळीं प्राशन केलें तर तोहि देव व्हायचा ! पण आज काय दिसतें आहे डोळ्यांनीं ! दुःखाचा हिमालय आपल्या विशाल अंतःकरणांत दडवून ती देवता आपल्या आयुष्याचा एकेक पळ व्यतित करीत आहे ! जगाला तिच्या आंतरिक दुःखाचा थांगहि लागणें शक्य नाहीं इतकी सखोल तिची थोरवी ! बाबासाहेब ! मीच लोटलें माझ्या कृपेला या भयाण गर्तेंत ! माझी ती मानलेली बहीण, पण सख्ख्या बहिणीपेक्षाहि तिचा जिव्हाळा अधिक प्रेमळ ! या नादान राक्षसाचा अमानुषपणा जाणून मी डोळ्याआड केला ! मनाला वाटलें, कालांतरानें घाण पदार्थांचेंहि उपयुक्त खतांत रूपान्तर होतें, तसाच बदल होईल याच्यांतहि; अन् माझी कृपा सुखांत राहील तेथें ! पण मीसुद्धां फसलों या भलत्याच कल्पनेनें, अन् माझी कृपा त्या राक्षसाच्या खाईत सडत आहे रात्रंदिवस ! कितीतरी दिवसांपूर्वीं बाबासाहेब, कृपेची ही कैफियत मला कळलेली होती, पण विचारांत विचारांतच आतांपर्यंतचा काळ गेला ! आतां तर कृपेलाहि अन्तर देऊन, तिच्या जीवनाच्या राखरांगोळीच्या सुमुहुर्तावरच हा नराधम पुन्हां नवें बाशिंग बांधून आणखी एका गायीची हत्या करण्यास अगदी टपलेला आहे ! किती बळी घेणार हा बलिभद्र कुणास ठाऊक !

"या असल्या विकराल जीवनाची योग्य झडती घेऊन अन् शक्य तोंवर यापुढें तरी या खाईत पडणाऱ्या जीवांचें सक्रिय संरक्षण करून, कृतज्ञतेचा एक मुस्कारा टाकावा; म्हणून बाबासाहेब मी एवढा हा उपद्व्याप केलेला आहे ! माझी कृपा, कधीं न् कधीं तरी या देवालयांत मला भेटेल म्हणूनच मी या देवालयाचा भक्त झालों आहे! मला या कार्यांत कदाचित् तुमचाहि चांगला उपयोग होईल अशी माझी कल्पना होती व आहे, म्हणूनहि मी एखाद्या बावळ्या मुशाफरासारखा इथें पडलों आहे. क्षमा करा माझ्या या अपराधाबद्दल ! हें सर्व एका श्रेष्ठ ध्येयसिद्धीकरितां मी करीत असल्यामुळें माझ्या अंतरात्म्याकडून तरी 'गुन्हेगार' अशी शिवी मला मिळणार नाहीं. दुनियेचें सोडून द्या ! चोर सोडून संन्याशींच सुळीं दिलेले आहेत तिनें कितीदांतरी !

" बाबासाहेब ! कृपेची न् माझी भेट होईल कां इथे कधीं ? म्हणजे तिचें मार्गदर्शन करीन मी शक्य तें. तुम्हाला ठाऊक आहेत कां हे इथले गृहस्थ ? मला कराल कां तुम्ही सहाय्य या कामांत ? तुम्ही जर मला या पुण्यकर्मांत सहाय्य द्याल बाबासाहेब, तर या धेण्डाचे हे थेर बन्द पाडण्याची मी प्रतिज्ञा कर...!"

जीवनच्या तोण्डून पुढील अक्षर निघण्यापूर्वीच; ' धुडुऽऽम् ' असा मोठा आवाज घुमला देवळांत ! उग्रगन्धाचे धूरानें सगळें देऊळ कोंडाळलें ! अन् जीवनचे डावे-कुशींतून पिस्तुलाची गोळी आरपार घुसून—

जीवनचें जीवन संपलें !!

पुजाऱ्यानें मोठी किंकाळी फोडली ! देवळांतून पूर्णचन्द्र पळून जात असतां, त्यानें पूर्णचन्द्रास पूर्णपणें ओळखलें.

मागाहून त्याच्या लक्षांत आलें कीं, देवळाचा मागील दरवाजा आज तसाच उघडा राहून गेला होता !

\+ + +

प्रभुपूरचे नागरीक, इतर शेकडों प्रेक्षक, स्थानिक अधिकारी; यांच्या प्रचण्ड समुदायांत—

—अनावर अश्रुपात व रडण्याचे हुंदके आवरण्याचा प्रयत्न करीत; भयाण मनःस्थितींत उभी असलेली गलितगात्र कृपा !

—तिच्या एका बाजूस ठेवलेलें रक्तबंबाळसें जीवनचें शव !

—दुसरे बाजूस हातापायांत बेड्या घातलेला अधोमुख उभा पूर्णचन्द्र !

—त्यांचेजवळच रडत रडत जबानी देत असलेले पुजारीमहाराज !

हा भेसूर देखावा बघवत देखील नव्हता !

थोड्या वेळानें—

जीवनचें शव घेऊन एका बाजूस कांहीं लोक निघाले !

बेड्या घातलेल्या पूर्णचन्द्रास घेऊन दुसरे बाजूस कांहीं लोक निघाले !

कृपेनें जीवनचें शवाकडे आपलीं अश्रुपूर्ण बुबुळें एकदां वळविलीं !

दुसऱ्याच क्षणास, अधोमुख चाललेल्या पूर्णचन्द्राकडे एकदां डबडबलेल्या डोळ्यांनीं तिनें पाहिलें !

दगडासहि पाझर फुटेल असा आर्त–करुण हंबरडा तिनें फोडला—

"...माझा जीव ऽ ऽ ऽ ऽ न् .....!......!"

सगळया प्रेक्षकांचे व अधिकाऱ्यांचे डोळ्यांतून अश्रुधारा वाहात होत्या त्यावेळीं !



# बुवाचा मठ ! : : : :

निर्गुणातीरीं मी बसलों होतों. सकाळची वेळ होती. पक्षी झाडांवर किलबिल करीत होते. मंद वारा वहात होता. निर्गुणेच्या त्या डोहाचें पाणी मध्यभागीं जरी संथ, स्थिर वाटे; तरी त्याच्या लहरी कडेच्या खडकावर आदळत. खडकाच्या कपारींत पाणी शिरे आणि लगेच सर्रर्र असा आवाज करीत बाहेर येई. परत दुसरी लहर अन् फिरून तोच क्रम. कितीतरी वेळपर्यंत मी त्या घटनेकडे पहात होतों. कपारींत गेलेलें पाणी इतक्या घाईनें अन् आपुलकीनें प्रवाहाकडे परत येई कीं, त्यानें मला संपतची आठवण करून दिली. माझा शेजारी संपत, तीन महिन्यापूर्वी आकोल्याला गेला. मिळेल तें काम करून पोटाचा खड्डा भरण्याचा निश्चय अन् काम मिळायला कांहीं उशीर लागेल म्हणून घरची सारी चीजवस्त बरोबर नेली होती त्यानें. वाडवडिलांची सांगीच आहे कीं, भूक नसो पण शिदोरी असो. पण शहरीं गुंडांनीं तीन महिन्यांत त्याला नागवला. भणभण भटकला बिचारा रस्तोरस्तीं. भेटेल त्याला सांगितली त्यानें आपली कर्मकथा. पण शहरचे कामी लोक ते! त्यांना कुठली सवड त्याच्याकडे लक्ष पुरवायला. शेवटीं काल आला बिचारा परत. भटकलेल्या कोंकरास आपला कळप अन् त्यांतून आपली आई मिळाली म्हणजे देखील होत नसेल इतका आनंद झाला होता संपतला काल. वास्तविक तीन महिन्यांपूर्वी असलेलें धान्य, किमी गाय अन् शेवंती तिची कालवड, न्हाणीवर वाढलेला तो कारल्याचा वेल, सोनकाड्याच्या छपरांत वावरणाऱ्या त्याच्या एकलकोंड्या जीवास एकमेव आधार असलेली त्याची ' पिसी ' मांजरी, ह्यापैकीं संपतजवळ आज कांहीं एक नव्हतें. तो अगदीं उघड्या-बोडक्या स्थितींतच परत आला काल रात्रीं. तो आकोल्यांत थांबला नाहीं. त्याच्या पायांनीं त्याला दुसरीकडे नेलें नाहीं; त्याच्या मनानें त्याला एकच मार्ग सांगितला अन् तो पण हिंगण्याला परतण्याचा. हिंगणें त्याचें होतें अन् तो हिंगण्याचाच होता. हिंगण्यांतल्या प्रत्येक माणसाच्या, प्रत्येक जनावराच्या, प्रत्येक झाडाझुडपाच्या

अन् दगडाधोंड्याच्या आंतल्या कप्प्यांत त्याला स्वतःची छोटीशी प्रतिमा दिसे. सारें हिंगणेंच मला चाहतें असें त्याला वाटे. माझें गणगोत, माझे सगेसोयरे, माझे चाहाते, सारे; अगदीं सारें हिंगण्यांत आहेत, मीच तेवढा इथें. पाण्यांतून बाहेर टाकलेला मासा तळमळत नसेल इतका संपत तळमळला आकोल्यांत.

\+ \+ \+

सूर्य बराच वर आला होता. झाडांवर पक्षांचा चुकून एखादाच शब्द ऐकूं येई. वारा मंदच होता. एक गोऱ्हा पलीकडील तीरावर आला. त्यानें नदी न्याहारली, व खालच्या मानेनें तो पाणवठ्याच्या जागीं उतरला. बुटकीं शिंगें, मस्त मान, उठावदार खांदा अन् राकट काळसर चामडी असलेला तो वळू होता. रात्रींच्या रात्रीं उभ्या पिकांची पुरमगज खादी अन् दिवसभर नदीकांठच्या एखाद्या प्रशस्त झाडाखालची रवंथ, हा अशा ढोरांचा नेहमींचा कार्यक्रम. त्याच्या डोळ्यावर धुंदी चढलेली दिसे. सामान्य माणसाला तर त्याच्या जवळून जायची देखील भीति वाटे. एकदोनदां त्यानें पाणी हुंगल्यासारखें केलें अन् शिवानंदांच्या 'ब्रह्मचर्य हेंच जीवन' मधील नियमाप्रमाणें दांत मिटून पाणी प्यायला सुरवात केली.

किल् किल्किल्! डुबू! भरकन् उडाला सिकरा! गोऱ्ह्याची शांती भंगली. त्यानें वर मान करून प्रथम समोर आणि नंतर सभोंवार पाहिलें. पिकांच्या रखवालदारांचा फार जाच ह्या रात्रपाळीवाल्या जनावरांना. खादीच्या मस्तीनें बेहोश झालेलीं हीं जनावरें बेफाम उधळतात. इतकीं कीं, काठी अगर हातफेकी दगडांनीं त्यांचा पाठपुरावा करून त्यांना हांकून लावणें राखणदारांना शक्य होत नाहीं. ह्या कामीं त्यांचें एकमेव साधन म्हणजे गोफणीनें भिरकावलेले धोंडे होत. अशा पैकींच एखादा दगड आल्याचा आमच्या मस्त गोऱ्ह्यास संशय आला, आणि म्हणूनच त्यानें सभोंवार न्याहारलें. पण तो नेहमींचाच सिकरा असल्याचें त्याला कळतांच त्यानें परत पाण्याला तोंड लावलें.

माझें चित्त आकर्षिण्यासाठींच कीं काय सिकऱ्यानें अगदीं माझ्यासमोर येऊन पाण्यांत डुबी मारली. क्षणांत वर निघून, भर्कन् गेली निघून स्वारी

जवळच्याच झाडांकडे. त्याच्या चोचींत एक मांसळी असल्याचें स्पष्ट दिसलें मला. नेहमींच तळाचा थांग घेणारे मासे, आदळ नाहींसा पाहून पाण्याच्या पृष्ठभागाजवळ येतात. त्या शांततेंत निर्भयता भासते त्यांना. अन् मग त्यांची अशी होते स्थिति. मानवी-जीवनांत देखील आपण तेंच नाहीं कां पहात ? लांब कशाला, आमच्या तुळशीरामचेंच पहाना. रामचंद्र पाटील फार भला माणूस. सरळ मनाचा अन् निगूतीनं वागणारा. मरेपर्यंत रुमणे नाहीं सोडलें हातचें बिचाऱ्यानें. तीनचार हजारांची पुंजी तुळशीरामच्या हातीं ठेवून सोडला त्यानें प्राण. शिवरामवर आभाळच कोसळलें. वयानें पोरसवदा, अनुभव थोडा. सगळेंच भयाण नि भकास वाटे त्याला. रामचंद्र पाटलाचा बाळापूरच्या ठगुचंद मारवाड्यावर फार भरवसा. इतरांचें कांहींही असो, रामचंद्र पाटलाशीं मात्र ठगूशेठ व्यवहारांत चोख असे. ठगबाजीवरच ठगाचा महाठग झालेल्या ठगूशेठजीचा त्यांतहि डाव होता. आपणाशीं बेईमानी करणाऱ्या दुकानदाराच्या दुकानाची पायरी रामचंद्र पाटील चढणार नाहींत हें त्याला पूर्णपणें माहीत होतें. मग त्याच्या पावलावर पाऊल टाकून येणारें सारेंगांव ? तें पण हातचें जायचें. व्यापारी बच्चाच तो. कधीं नाही सोडायचा आपला कावा. रामचंद्र पाटलांशीं त्याची ईमानदारी म्हणजे हिंगणे गांव लुबाडण्याचा एकमेव मार्ग हें ओळखून शेवटपर्यंत तो त्यांच्याशी वागला.

चार मंडळींच्या सांगीवरून तुळशीरामानें आपली सारी पुंजी ठगूशेटजीच्या सुपूर्द केली. भाऊबंदकीचा झंझावात, सोयऱ्याधायऱ्यांची नजर अन् खालच्याघरचे वासे मोजणाऱ्या गावगुंडांची दुष्ट बुद्धि या सर्वांपासून अलिप्त अशी ठगूशेटजीची तिजोरी तुळशीरामास सुरक्षित वाटली. भोळा बिचारा !

अखेर व्हायचें तेंच झालें ! परवांच ठगू शेठजीच्या दिवाळ्याने सारा बाळापूर बाजार हादरला होता. पहातां पहातां साठसत्तर हजारांच्या ठेवी बुडाल्या. तुळशीराम मात्र चांगलाच होरपळून निघाला. कालच बाबू वाणी सांगत होता कीं ठगूशेठजीच्या भाच्यानें वाशीमला भलें मोठें दुकान टाकलें म्हणून.

× × × ×

सूर्य वरवर येत होता. पलीकडच्या तीरावरील झाडी सोडून माझी दृष्टि लांब दूर गेली. तें एक टेंकाड होतें. त्यावरील जागोबाचें देऊळ मला स्पष्ट

दिसलें. त्याचा तो पांढरा रंग सूर्य-प्रकाशांत अधिकच खुलून दिसे त्याच्या आवाराच्या त्या भक्कम भिंती, उंचच उंच शोभणारा तो घुमट अन् त्यावरील तो सोनेरी कळस. मी कितीदां तरी त्या देवळांत गेलों होतों आजपर्यंत. पण एकाच दृष्टिक्षेपांत सारें देऊळ पहाण्याचा माझा हाच पहिला प्रसंग होता. मला इतकें सुंदर तें यापूर्वी कधींच दिसलें नव्हतें. मानवीजीवनाचें देखील असेंच असेल का ? जीवनांतील संकुचित दृष्टीमुळें खरोखरच आपण अगणित वस्तु आणि घटनांतील सौंदर्यास मुकत असूं का ? ' सारेंच सौंदर्यमय आहे, बघणारास दृष्टिमात्र हवी.' खरें का हें ? माझी नजर देवळावरच खिळलेली होती. मी विचारमग्न होतों. इतक्यांत ढोल वाजला. घंटीनें त्याला साथ दिली. ताल धरायला झांज सरसावली अन् मोठा ' जयजयकार ' माझ्या कानीं आला. सकाळची आरती चालली होती. आरतीचीं वाद्यें तेवढीं मला ऐकूं येत होतीं; पण तो नित्य परिचयाचा देखावा माझ्या डोळ्यासमोर स्पष्ट दिसत होता मला. गळ्यांत रुद्राक्षाची माळ, डोक्यावर अस्ताव्यस्त रुळणाऱ्या जटा अन् कमरेस पंचा असलेला उघडाबोडका तो पुजारी ! सर्वच बुवामहाराज म्हणतात त्याला. ढोल अन् घंटा वाजविणारे त्याचे ते दोन चेले, अन् आमच्यासारखा दर्शनाला आलेल्यापैकीं एखादा झांजवाला. मनुष्य कसा गुंगून जातो अगदीं त्या गजरांत ! त्यांतच मधून मधून होणारा शंखनाद. अगदीं सत्यमय वाटलें वातावरण तिथलें मला काल सायंकाळपूर्वी. पण आज मला ती माळ रुद्राक्षमण्यांची वाटत नसून माणसांच्या कवट्यांची वाटते. बूवामहाराजांच्या आंगावरील पट्टे विभूतीचे वाटत नसून एखाद्याच्या चितेंतील राखेचे वाटतात आणि तो कानठळ्या बसविणारा आवाज, अन्याय नि अत्याचाराच्या घाणींत चिरडल्या जाणाऱ्या जीवांचा आक्रोश लोकांच्या कानीं पडूं नये म्हणून केला जातो असें माझें मन मला सांगतें.

काल सायंकाळची आरती संपली होती. महाराजांजवळ त्यांचे दोन चेले आणि मी एवढीच काय ती मंडळी. ' आणखी दोघांना दीक्षा द्या, ते आमचे दोस्त आहेत. फार धार्मिकवृत्तीचे आहेत ते...' वगैरे माहिती चेल्यांनीं महाराजांना दिली.

' बेटा ऐसा नहीं करना। खाली आश्रम बढाने से काम नहीं चलेगा। जानते हो, यहाँसे ही एक बाबा को सरकार नें जेल में भेजदिया है। कोई चालीस-पचांस लोगोंका उन्होनें परिवार बनाया था। खातेपिते और खूप मजा उडाते। कहा जाता है कि तब ग्रामवासी भी यहाँ बहोत आया करते थे। मगर बाद में पता चला कि महाराज और उनका शिष्यगण एक बडा निकम्मा काम करते थे। वे हत्यारे थे। कई लोगों की जायदाद उन्होनें बरबाद की थी। वे लुटेरे थे, डाकू थे। ...... '

बुवाचें वाक्यन्वाक्य पुन्हां माझ्या कानावर आदळल्यासारखें वाटलें मला. चेल्यांचें समाधान करण्याचा त्यांचा प्रयत्न होता तो. मोठ्या स्फूर्तीनें निघे एकेक वाक्य त्यांच्या तोंडून.

इतक्यांत,

' ओ बुवा ! थोपवाहो ढोराईले ! ' अशी आरोळी आली. माझ्या समाधीचा भंग झाला. राखणदारानें गोफणीच्या माऱ्यानें गुरें इकडे कलविलीं होतीं; त्याच्या मदतीला जाण्याच्या उद्देशानें मी निघालों !

